करणारीं धार्मिक, सामा.
मनोरंजक व लहान
ांचा प्रसार करणें.
वर्षांतून चार पुस्तकें

असून सर्व पुस्तकांचा
रणाऱ्यास ट. ख. सह

वीं नांवें त्या वर्षांत

आश्रयदाते समजले
ील. व त्यांना प्रत्येक
पुस्तक मोफत दिलें जाईल.

६ शंभर रुपये देणाऱ्या हितचिंतकांचा फोटो व अल्प परिचय एकाद्या पुस्तकांत प्रसिद्ध केला जाईल व त्यांचें नांव कायमच्या आश्रयदात्यांत नोंदवून त्यांनाही सर्व पुस्तकें मोफत दिलीं जातील.

विनंति—जैनसमाजांत अशाप्रकारें प्रचारकार्य करणारी ही एकच माला आहे. सध्यांच्या परिस्थितींत वाङ्मय प्रसाराचें किती महत्व आहे हें जाणून प्रत्येकांनीं हस्ते परहस्तें मदत केल्यास मालेचें कार्य अखंडितपणें चालविण्यास उत्साह येईल.

---

मालेचें पुढील पुस्तक—

## —: प्राचीन जैनाचार्य :—

लेखकः—श्री. प्रियंकर कुमार जैन.

श्रीवीरग्रंथमाला, पुष्प ११ वें

# चामुंडराय.

[ नाटक ]

लेखक व प्रकाशक,
आणा भाऊ मगदूम, ' राष्ट्रभाषा कोविद '
सं. श्रीवीरग्रंथमाला, सांगली.

मुद्रक,
रा. ब. आण्णाराव फडेप्पा चौगुले वकील
श्रीमहावीर प्रेस, बेळगांव.

आवृत्ति १ ली ] जानेवारी, सन १९४२ [ किंमत ६ आणे.

# चार शब्द.

प्रिय वाचक, आज आपल्या हातीं मालेचें नवीन पुष्प **'चामुंडराय'** हें नाटक देत आहे. सध्याच्या महागाईच्या काळांत जेथें वर्तमानपत्रें बंद पडत आहेत तेथें फक्त एका रुपयांत चार पुस्तकें देणें किती धाडसाचें आहे, याची आपल्याला सहज कल्पना करतां येईल. तथापि हें कार्य आपल्या सर्वांच्या सहानुभूतीनेंच यशस्वी होत आहे, हें व्यक्त करण्यास आनंद वाटतो. वाचकांनीं व जैन धनिकांनीं असेंच प्रोत्साहन दिल्यास अधिक उत्साहानें हें प्रकाशनकार्य करतां येईल अशी उमेद आहे

जैनांचा पूर्वेतिहास अत्यंत उज्वल असून सुदैवानें आज बऱ्याच लोकांचें लक्ष तिकडे वेधलें आहे. ऐतिहासिक कादंबऱ्या, नाटकें आणि लघुकथा लिहून ललित वाङ्मयाबरोबरच सामान्य वाचकांना इतिहासाचें ज्ञान करून देतां येण्यासारखें आहे. त्याच उद्देशानें हें नाटक लिहिलें आहे. आपल्या समारंभांतून करतां येण्यासारखीं लहान नाटकें देखील फारशी नाहींत. ती उणीव अल्पांशानें तरी या पुस्तकानें दूर होईल अशी आशा वाटते. कोठेंही थोडक्यांत हें नाटक करतां यावें अशी दृष्टी ठेवूनच हें नाटक लिहिलें असल्यामुळें व मर्यादित पृष्ठांतच तीन अंक पुरे करण्याचा हेतु धरल्यामुळें स्त्रीपात्रांचें काम मर्यादित करून विनोदास फांटा द्यावा लागला. सध्याच्या परिस्थितींत आमच्या मालेच्या वाचकांना जें उपयुक्त त्याच दृष्टीनें हें नाटक लिहिलें असल्यामुळें सुधारलेल्या नाट्यतंत्राकडे कदाचित् दुर्लक्षही झालें असेल. तथापि जैन इतिहासकथांवर आधारलेल्या ललित वाङ्मयाची आवड वाचकांत उत्पन्न झाली, तरी आमचें कार्य सफल झालें असें ह्मणतां येईल

हें नाटक लिहितांना आमचे मित्र श्री. ए० डी० खोत यांनीं कांहीं उपयुक्त सूचना केल्याबद्दल त्यांचा अत्यंत आभारी आहे.

**समडोळी**, माघ शु. ५ }
श्रीवीरसंवत् २४६८ }

**लेखक.**

सादर

# समर्पण



श्रीमान् धनकुबेर दानवीर–

साहू शांतिप्रसादजी जैन, बी. एस्. सी.

डालमियानगर, यांचे करकमलीं

दानवीर श्रीमान् साहू शांतिप्रसादजी जैन हे डालमिया सिमेंट कंपनी लि.; भारत इन्शुरन्स लि.; रोहतास इंडस्ट्रीज इत्यादि अनेक कंपन्यांचे डायरेक्टर असून भारतवर्षांतील एक प्रतिष्ठित व्यापारी आहेत. शांतवृत्ती, आनंदी मुद्रा आणि दिलदारपणा इत्यादि गुणांमुळें त्यांची छाप कोणावरही सहज पडूं शकते. ते एक कुशल व्यापारी असल्यामुळें पैसा कमविणें हा त्यांच्या हातचा मळ आहे. तथापि त्यांना धनाचा बिलकूल लोभ नाहीं. त्यामुळें मिळालेल्या धनाचा जनसेवेसाठीं उपयोग करण्यांतच त्यांना धन्यता वाटते. त्यांनीं आजपर्यंत लाखों रुपयांचा दानधर्म केला आहे. शिक्षणप्रसार, वाङ्मयोद्धार, धर्मप्रचार, इतिहास संशोधन अशाच कार्याकरितां ते उदार हस्तें साह्य करीत आहेत. भारतवर्षांत अनेक श्रीमान् दानवीर आहेत. परंतु ऐन तारुण्यांतच लाखों रुपयांचा दानधर्म करणारा असा महात्मा विरळाच सांपडेल.

यांच्या सुशील पत्नी श्रीमती रमारानीजी या देखील दानवीर पतीला शोभण्यासारख्याच दानशीला आहेत. असें असूनही या आदर्श पतिपत्नींत अभिमानाचा लवलेशही नाहीं. थोड्याच दिवसांपूर्वी इंदूर येथील महोत्सवाच्या वेळीं सात लाख रुपयांचा दानधर्म केला, ही गोष्ट सर्वांना विदीतच आहे. महाराष्ट्रांत श्रीवीरग्रंथमालेच्या वाङ्मयप्रसाराचें छोटेसें कार्य पाहून श्रीमान् साहूजींनीं मालेस शंभर रुपये देऊन आश्रयदात्यांच्या यादींत नांव नोंदविलें आहे. अशा गुणसंपन्न, उदारधी आणि जिनधर्मप्रभावक दानवीरांना जिनेश्वर दीर्घायुष्य देवो आणि त्यांच्या हातून जैनसमाजाच्या सर्वांगीण उन्नतीचें कार्य यशस्वी होवो, हीच सदिच्छा व्यक्त करीत आहे.

आ. भा. मगदूम.

# कथासंदर्भ व पात्रपरिचय.



जगांतील अनेक आश्चर्यांत ज्या मूर्तीची गणना होते ती श्रीगोमटेश्वर-बाहुबलीची प्रचंड मूर्ती चामुंडरायानें स्थापना केली; आणि त्या अद्वितीय मूर्तीबरोबरच वीर चामुंडरायानें आपलें नांव अजरामर केलें आहे.

सध्यां म्हैसूरचें जें राज्य आहे त्याच प्रदेशांत इ. स. च्या दहाव्या शतकांत गंगवंशीय राजे राज्य करीत होते. गंगराजा दुसरा मारसिंह इ. सन ९७४ त मृत्यु पावला. त्यानंतर गंगराज्यांत जी बेबंदशाही माजली ती नाहींशी करण्याकरितां चामुंडरायानें सेनापतिपदाचा स्वीकार केला, आणि अनेक शत्रूंचा पाडाव करून त्यानें राजमल्लास गादीवर बसविलें. चामुंडरायानें अनेक विरोधी सामंतांना धुळीस मिळवून गंगराज्याचें वैभव वाढविलें. त्याच्या कर्तबगारीवर खूष होऊन राजमल्लनें त्याला अनेक पदव्या देऊन व प्रधानपदही त्याच्याचकडे ठेवून त्याचा गौरव केला.

चामुंडराय हा ब्रह्मक्षात्र कुलोत्पन्न जैन होता. त्याच्या पित्याचें नांव महाबालय्य व मातेचें काललदेवी असें होतें. काललदेवी अत्यंत धर्मनिष्ठ होती. पुराणांतर्गत बाहुबलीच्या मूर्तीचें वर्णन ऐकून तिनें त्या मूर्तीचें दर्शन करण्याची इच्छा दर्शविली. म्हणूनच चामुंडरायानें श्रवणबेळगोळ येथील श्रीबाहुबलीच्या प्रचंड मूर्तीचा शोध लावून आपल्या मातेची इच्छा पूर्ण केली. सिद्धांत-चक्रवर्ति नेमिचंद्राचार्य हे चामुंडरायाचे गुरु होते. चामुंडराय ज्याप्रमाणें मोठा पराक्रमी योद्धा आणि राजकार्यकुशल मुत्सद्दी होता त्याचप्रमाणें तो कवीही होता. कानडी भाषेंत त्यानें लिहिलेलीं कांहीं पुराणें उपलब्ध आहेत. कवि रन्न हा त्याचा आश्रित होता. एकंदरींत पहातां भारताच्या इतिहासांत चामुंडरायासारखे सर्वगुणसंपन्न वीर फारच थोडे निघ-

तील. शौर्य, साहस, निःस्वार्थता, उदारपणा, मुत्सद्दगिरी, धर्मप्रेम, विद्वत्ता वगैरे अनेक गुणांनीं त्याचें चरित्र त्यागी आणि भोगी या सर्वांनाच आदर्श-वत् झालें आहे.

चामुंडरायाचें स्फूर्तिप्रद चरित्र कानडी भाषेंतील अनेक ग्रंथांतून वर्णन केलें आहे. कानडीप्रमाणें मराठी भाषेवरही चामुंडरायाचें प्रेम असल्याचें दिसून येतें. कारण गोमटेश्वराच्या पायाजवळ कोरलेला शिलालेख मराठींतही आढळून येतो.

वीर **चामुंडरायाचें** हें चरित्र नाट्यरूपानें लिहिलें असल्यामुळें इतर पात्रांचा परिचय खालीं दिला आहे.

१ **राजमल्ल**—गंगवंशीय राजा. ( मारसिंहाचा मुलगा )
२ **रक्कसगंग**—राजमल्लचा धाकटा भाऊ.
३ **प्रधानजी**—राजमल्लचा मुख्य कारभारी.
४ **रन्न**—चामुंडरायाचा आश्रित कवि.
५ **मुद्दुराचय्य**—विद्रोही सामंत.
६ **वज्रदेव**— ,, ,,
७ **जयपाल**—गंगराज्याविरुद्ध कारस्थानें करणारा खल पुरुष.
८ **गोविंदमय्य**—चामुंडरायाचा आश्रित सरदार.
९ **भीमय्य**—जयपालचा सहकारी.
१० **नृपकाम**—विद्रोही किल्लेदार.
११ **राजमाता**—राजमल्लची आई.
१२ **काललदेवी**—चामुंडरायाची माता.
१३ **राजुलदेवी**—सामंत वज्रदेवाची पत्नी.
**याशिवायः-कांहीं दूत, यात्रेकरू वगैरे सामान्य पात्रें.**

---

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

# चामुंडराय



## अंक पहिला.

**प्रवेश पहिला--**

[स्थळ—वनप्रदेश, एक धनुर्धारी वीर दूरवर न्याहाळीत आहे. कोणाच्यातरी ओरडण्याचा पडद्यांतून आवाज येतो. ]

**पडद्यांत**---अरे बापरे! वाघ! वाघ! मरतो आतां मी, मरतो, मरतो-

**धनुर्धारी**—मला वाटलेंच तसें, तो पहा वाघ, अगदीं त्या मनुष्या-जवळ गेला आहे. आतां मात्र तो त्याच्यावर झेंप घालणार! ठीक आहे, (भात्यांतून बाण काढून वाघावर सोडतो. वाघाचें भयानक ओरडणें ऐकूं येतें; आणि एक भेदरलेला मनुष्य मागें पहात पहात धांवत येतो. )

**एक इसम**---अरे बापरे! जगलो, जगलो आतां! पुनर्जन्मच झाला ह्मणायचा; वाघ उडी घेणार इतक्यांत कुठूनतरी त्याच्या मर्मस्थानीं बाण येऊन घुसला; आणि माझ्यावर आलेल्या काळराहूनें त्या वाघावरच झेंप घातली. किती विचित्र हा योग! तो बाण सुटायला एका क्षणाचाच विलंब लागला असता, तर या निर्जन अरण्यांत माझी प्राणज्योत विलीन झाली असती. हो! पण हा बाण कुठून आला बरें? कोणी सोडला हा बाण? धन्य, धन्य तो वीर! माझ्या जीवनदात्या तुला शतशः प्रणाम असो. काय तें भयानक दृश्य! काय तो जबडा, अरे बापरे! अजूनही माझी छाती धडधडते आहे; अंग थरारतें आहे! (असें ह्मणत ह्मणत मागें सरत येतो, व त्या धनुर्धारी वीरास येऊन थडकतो. घाबरून ह्मणतो) अरे बापरे!

को-को-कोण ? कोण तुह्मी ? अं-अं-चामुंडराय ? आणि तुह्मी इकडे या वनांत कुठें ? धन्य, धन्य आहांत, चामुंडराय ! तुह्मीच तो बाण सोडला ना ? माझ्या प्राणावरील संकट दूर करून तुह्मीच मला पुनर्जन्म दिला आहे ! पण-पण आपण यावेळीं इकडे कुठें ? शिकारीला गेला होता ?

**चामुंडराय**—शिकारीला ! नाहीं, रत्न शिकारीसाठीं कां ही धनुर्विद्या मिळविली ? निर्बल प्राण्यांची शिकार करण्यासाठीं आह्मां क्षत्रियांचा जन्म नसून दुसऱ्यांची शिकार बनणाऱ्या दुर्बलांचें रक्षण करण्याकरितां हें शस्त्र हातीं धरिलें आहे, आणि त्याचा प्रत्यय तुह्मांला आतांच आला आहे.

**रत्न**—माफ करा चामुंडराय ! तुमचें हें क्षात्रतेज पाहून मला अत्यानंद होत आहे. तुमच्या उपकाराच्या ओझ्यानें दडपून गेलेलें हृदय आदरानें अधिकच नम्र होत आहे. केवळ हौसेखातर शिकार करणार कित्येक वीर मी पाहिले आहेत, ह्मणूनच मी आपल्याला तसें विचारलें.

**चामुंडराय**—रत्न, तुह्मी मोठे बुद्धिमान आहात. पाठशाळेंत शिकलेलें अहिंसेचें तत्वज्ञान कितपत माझ्या आंगीं बाणलें आहे, हें पहाण्यासाठींच तुह्मी हा प्रश्न काढला ना ? कर्तव्याची जाणीव देणें हेंच खऱ्या मित्राचें कर्तव्य आहे. पण रत्न, तुह्मी इकडे या वाघाच्या जबड्यांत कुठें निघाला होता ?

**रत्न**—कुठें जाणार ? कोठें तरी आश्रय मिळवावा, ह्मणून भटकतो आहे. चामुंडराय, तुह्मी धनुर्विद्याविशारद होऊन राजदरबारांत चांगलीच मान्यता मिळविली आहे, तुमची कीर्ति यापूर्वीच माझ्या कानीं आली होती. नोलंबच्या युद्धांत तुह्मी जो पराक्रम गाजविला त्यामुळें मारसिंह महाराज फारच खुष झाले आणि त्यांनीं तुह्मांला 'वीरमार्तंड' ही बहुमानाची पदवी दिली. हा सर्व वृत्तांत ऐकून मला फार समाधान वाटलें.

**चामुंडराय**—एकूण, तुह्मी मारसिंह महाराजांच्या भेटीला गेला होता तर ?

**रत्न**—होय ! आणि तिकडूनच आतां परत निघालों आहे. चामुंडराय, तुह्मी धनुर्विद्या विशारद झाला, आणि तुमच्या वीरकृतीचें सर्वत्र कौतुकही झालें. त्याचप्रमाणें मी जीं काव्यें रचिलीं तीं मारसिंह महाराजांना दाखवून राजाश्रय मिळवावा याच हेतूनें तिकडे गेलो होतो.

**चामुंडराय**—मग काय झालें ? महाराजांना तुह्मी आपले काव्यग्रंथ दाखविले ना ?

**रत्न**—नाहीं. सध्यां ते फार आजारी आहेत. त्यामुळें निराश होऊन मी परत निघालों आहे !

**चामुंडराय**—हवापालट करण्यासाठीं बंकापूरला जाऊनही त्यांच्या प्रकृतींत कांहींच सुधारणा झाली नाहीं तर ? पण तुह्मी इकडे कुठें जाणार ह्मणतां ?

**रत्न**—कुठें ! कुठें जायचें हें अद्याप निश्चित ठरलें नाहीं. कुठेतरी भटकून कोणाचा तरी आश्रय मिळवायचा, हेंच !

**चामुंडराय**—मग इथेंच रहा ना तुह्मी. मारसिंह महाराजांना थोडें बरें वाटतांच ते आपले ग्रंथ पाहून आपल्याला जरूर आश्रय देतील. ते मोठे गुणग्राही व कलाप्रेमी आहेत, तुमचीं काव्यें आवडलीं तर चांगला गौरव होईल तुमचा.

**रत्न**—चामुंडराय, या अभाग्याला आपणच वाघाच्या जबड्यांतून वांचविलें आहे, तेव्हां आपल्याच कृपेनें राजाश्रयही मिळून माझें कल्याण व्हावें असाही विधिसंकेत असेल.

**चामुंडराय**—चला तर आतां, घरीं जाऊनच आपण बोलत बसूं. हो, पण रत्न मी नेमिचंद्राचार्यांच्या दर्शनाला निघालों होतों. चला तुह्मीही. येथून जवळच एका गुहेंत ते राहात आहेत. त्यांचें दर्शन घेऊनच घरीं जाऊं.

**रत्न**—ठीक आहे, चला तर. ( जातात. )

---

### प्रवेश दुसरा—

( स्थळ-राजवाडा, सामंत वज्रदेव विचार करीत आहे. )

**वज्रदेव**—संधी मोठी नामी आहे! मारसिंह तर आतां वृद्ध झाला आहे. त्याच्यांत युद्ध करण्याची धमक उरली नाहीं; आणि सध्यां गंगराज्यांत नांव घेण्यासारखा कोणी वीर सेनापतीही दिसत नाहीं. अशा प्रसंगीं जर मारसिंह मुनिसन्निध राहून आपला वृद्धापकाळ कंठण्याचा निश्चय करीत असेल तर माझे मनोरथ पूर्ण झालेच ह्मणून समजावें. गंगवाडींत माझ्यासारखे जे अनेक सामंत आहेत, त्यांच्या जिवावरच मारसिंहाचें हें सिंहासन स्थिर आहे ना? आह्मीं सर्वांनीं जर मदत केली नसती, आमच्या पराक्रमाचा धाक बसवून सभोंवारचा मुलूख ताब्यांत ठेवला नसता, तर गंगराज्याला आजचें वैभव प्राप्त झालें नसतें. पण हें वैभव मला भोगतां येणार नाहीं काय? माझ्या ताब्यांत असलेल्या सैन्याच्या जोरावर जर मी स्वतंत्र होण्याचा आणि भोंवतालचा मुलूख जिंकून महामंडलेश्वर बनण्याचा प्रयत्न केला, तर तें अशक्य आहे काय? ........... नाहीं! यापुढें हा वज्रदेव एक क्षणदेखील दुसऱ्याचा ताबेदार राहाणार नाहीं. राजाधिराज बनण्याचें भाग्य या वज्रदेवालाच लाभणार आहे. आतां हा वज्रदेव कोणाचा सामंत न राहतां स्वतंत्र राजा होणार!......अहाहा, राजाधिराज; वज्रदेव राजाधिराज! खरोखरच किती महत्व भरलें आहे या दोन अक्षरीं शब्दांत! माझ्या कानांत कसला आवाज घुमतो आहे हा? 'राजाधिराज वज्रदेवाचा विजय असो.' (दोन तीन वेळां ह्मणतो, तो आवाज ऐकून त्याची पत्नी येते.)

**राजुलदेवी**—हें काय? काय बडबडतां हें? आपल्याला वेड तर नाहीं ना लागलें. किती घाबरून गेलें मी.

**वज्रदेव**—अग, अग, आहेस कुठें तूं. काय ह्मणतेस वेड लागलें? वेड, कां नाहीं लागणार? पण तुला त्याची काय कल्पना असणार?

**राजुल**—आपण ह्मणतां आहांत तरी काय ? आपल्याला स्वप्न तर पडलें नाहीं ना ?

**वज्रदेव**—स्वप्न ? स्वप्न ! खरेंच स्वप्नच आहे हें. राजुल मी ज्या आनंदाचा, ज्या सुखाचा अनुभव घेत आहे, तें स्वप्नच आहे. किती किती गोड स्वप्न आहे ह्मणून सांगूं !

**राजुल**—चला, बसा असे इकडे, स्वप्न तें स्वप्नच, स्वप्नांतला आनंद जागृतपणीं का मानायचा असतो ?

**वज्रदेव**—नाहीं. राजुल, मला नुसतें स्वप्न पडलें नाहीं; मी अनुभवती आहे तें 'सत्यं शिवं सुंदरम्' असें सुख आहे. अग हा वज्रदेव आणखी थोड्याच दिवसांत राजा होणार आहे. राजाच काय पण राजाधिराजही होणार! आणि तूं, राजुल तूं देखील एका सामंताची बायको ह्मणून न राहतां महाराणी राजुलदेवी बनणार ! काय समजलीस ? महाराणीपदाचा मान, राणीसाहेब ! अहाहा! काय पण ही शब्दमाधुरी, राणीसाहेब-(एक दूत येऊन मुजरा करतो)

**दूत**—सरदारसाहेब,

**वज्रदेव**—काय, काय ह्मणतोस ? सरदारसाहेब ? नाहीं, यापुढें मी कोणाचाही सरदार नसून मी राजा झालों आहे, ह्मण राजेसाहेब ह्मण.

**दूत**—राजेसाहेब--

**वज्रदेव**—छान, राजेसाहेब, आतां कसें बोललास, राजेसाहेब, बरें काय निरोप आणला आहेस, सांग पाहूं.

**दूत**—सरदारसाहेब-अं हं-राजेसाहेब, आपल्याला भेटण्याकरितां बाहेर दिवाणखान्यांत कोणी आले आहेत. कांहीं महत्वाचें काम असल्यामुळें ते आपली मार्गप्रतीक्षा करीत आहेत.

**वज्रदेव**—चल आलोच मी--बघ राजुल, नव्हे नव्हे, बघा राणी-साहेब, काय पण मौज आहे, एका क्षणांत राणीसाहेब. ( जातो )

**राजुल**—काय करावें यांना, असे हे वेड्यासारखें काय बरळत आहेत घरें ?......पण तसं पाहिलं तर वेडे तरी काय ह्मणून? इकडचा पराक्रम तरी काय कमी आहे? इतकी मोठी सरदारकी मिळविली आहे, मग नशिबीं असेल तर राजपद तरी कां मिळणार नाहीं ? पण मला बाई हें नाहीं आवडत, स्वतःच कसें ह्मणतात. राणीसाहेब, किती लाज वाटली मला, पण अजून हेच जर राजे बनले नाहींत तर मी राणी तरी कसली ? हा कां राजाराणीचा खेळ आहे, नाहीं... खेळ तर नाहींच, पण खरंही नाहीं; खरंच मी राणी बनेन कां ?

**जयपाल**—( एकदम येऊन ) न बनायला काय झालं ? हा जयपाल जिवंत आहे तोंपर्यंत राणीच काय पण तुह्माला महाराणीदेखील बनवील. जाऊं दे तें, पण सरदारसाहेब कुठं आहेत, त्यांना लवकर भेटलें पाहिजे मला—( जाऊं लागतो. )

**राजुल**—अहो, अहो जयपाल, पण इतकी कसली आली आहे घाई, मला नाहीं ना सांगत, हें राजाराणीचं कसलं वेड लावलं आहे त्यांना ?

**जयपाल**—काय ह्मणे राजाराणीचं वेड ! अहो तुह्मांला काय सांगूं आतां, उगीच नाहीं हें जयपालाचं डोकं, खरोखरच मी त्यांना राजा बनविणार आहे; आणि तुह्मांला राणी करणार, आणि—

**राजुल**—आणि तुह्मी कोण, प्रधान होणार ! असंच ना ?

**जयपाल**—अगदीं योग्य बोललात पहा, कित्येक वर्षें मनांत घोळत असलेले विचार आज खरे ठरण्याची वेळ आली आहे. पण......महाराज कुठें आहेत ? ( वज्रदेव येतो ).

**वज्रदेव**—हा पहा आलोच मी, जयपाल केव्हां आलास तूं ? हं सांग, सांग आतां तिकडली वार्ता, ( राजुलकडे पाहून ) राजुल, तूं थोडावेळ आंत जा पाहूं.

**राजुल**—कळली तुमची गुप्त गोष्ट मला, तुह्मी राजा आणि हा जयपाल प्रधान हेंच ना ? खुशाल खलबतं करीत बसा, मी कशाला राहूं ऐकायला. ( रागानें निघून जाते. )

**वज्रदेव**—अग, अग,......पाहिलस कां जयपाल, या वेडीला काय कळायचं आहे, पण उद्यां राणी झाली ह्मणजे मग जाईल हा रुसवा. बरं, जयपाल काय हकीगत आहे ?

**जयपाल**—आपले मनोरथ पूर्णपणें सिद्धीला जाण्याची वेळ आली आहे. हें जयपालाचें डोकें आहे. वाया जायचें नाहीं. मागें आपल्याला जें जें कळलें होतें तें सर्व खरें आहे मारसिंह महाराज फार आजारी असून सध्यां बंकापूरला मुनिसन्निध जाऊन राहिले आहेत. इतकेंच नाहीं पण एकदोन दिवसांत ते सल्लेखनादेखील घेतील अशी वार्ता आहे.

**वज्रदेव**—काय ह्मणतोस, सल्लेखनादेखील घेतील ! मग राहिलें काय आतां, तुझी योजना पूर्ण सफल झाली. शाबास, शाबास जयपाल, खरोखरच तूं प्रधान होण्याच्या लायखीचा आहेस.

**जयपाल**—शिवाय सध्यां गंगवाडींत सैन्यही अगदींच थोडें असून चांगला सेनापतीही कोणी नाहीं. त्यांचा प्रधान तर इतका वृद्ध झाला आहे कीं, त्यालाही लवकरच सल्लेखना घ्यावी लागणार.

**वज्रदेव**—अरे मग राहिलं काय आतां, जयपाल झालास तूं प्रधान. झालास, ह्मण, ह्मण मला एकवार राजेसाहेब ह्मण.

**जयपाल**—अहो पण असं उतावीळ कां ? अगोदर राज्य मिळवा, राजे व्हा, मग राजेसाहेब अन् राणीसाहेब.

**वज्रदेव**—राज्य मिळवायचें आतां काय राहिलें आहे ? चल आजच्या आज मी स्वतंत्र झाल्याची ग्वाही फिरवितो.

**जयपाल**—थांबा, इतकी घाई नको, पूर्ण विचार करूनच या गोष्टी केल्या पाहिजेत. गंगवाडींत आपल्यासारखे अनेक सामंत आहेत; आणि

मारसिंहावर त्यांचें प्राणापलिकडे प्रेम आहे. मारसिंह जिवंत आहे तोंपर्यंत जर आपण घाई केली, तर आपला सत्यानाश झाल्याशिवाय राहणार नाहीं. मग राजा तर नाहींच, पण या सामंतपदासही मुकावें लागेल. महाराजांनीं सल्लेखना घेतली तर त्यांच्या मृत्यूनंतर बेबंदशाही माजल्यावांचून राहाणार नाहीं. निष्णात् सेनापतीचा अभाव, बालवयी राजपुत्र, आणि निरुत्साही वृद्ध प्रधान, अशा संधीचा फायदा घेऊन जो तो स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करणार.

**वज्रदेव**—मग त्यावेळीं आपलें कसें साधणार ?

**जयपाल**—तेंच तर मी सांगणार आहे. स्वतंत्र होण्याची कल्पना आज कोणाच्याही डोक्यांत नाहीं. ह्मणून यावेळीं आपण बरेंच सैन्य जमवून गुप्तरीतीनें तयारी केली पाहिजे. आणि उद्यां बेबंदशाही माजतांच गंगराज्यावर हल्ला चढवून राज्य हस्तगत केलें पाहिजे. तोंपर्यंत याचा कोठेंही स्फोट होतां कामा नये.

**वज्रदेव**—जयपाल, खरें आहे तुझें ह्मणणें.

**जयपाल**—चला तर; आजपासूनच सैन्यभरतीला प्रारंभ करूं, आणि अशी संधी साधूं कीं, एका क्षणांत......

**वज्रदेव**—मी राजा आणि तूं प्रधान होऊं (जातात)

---

## प्रवेश ३ रा.

(स्थळ—चामुंडरायाचें घर—कवि—रन्न आणि चामुंडराय मातेजवळ बोलत बसले आहेत.)

**रन्न**—माताजी खरोखरच त्या दिवशीं माझा पुनर्जन्म झाला. आपल्या या वीरपुत्रानें त्या दिवशीं मला वांचविलें नसतें तर त्या वनराजाच्या भक्षस्थानीं पडून माझी इहलोकीची यात्रा संपली असती. माताजी आपण

मोठ्या भाग्यशाली आहांत, ह्मणूनच असा वीरमार्तंड पुत्र आपल्या पोटीं जन्माला आला. त्यांचे उपकार अनेक जन्मांत मजकडून फिटणार नाहींत.

**काललदेवी**—यांत उपकार ते कसले ? शस्त्रविद्येंत प्राविण्य मिळविणें, आणि देश, धर्म व शील यांच्या रक्षणासाठीं त्याचा उपयोग करणे हें तर क्षत्रियांचें कर्तव्यच आहे. मग चामुंडरायानें त्यांत विशेष तें काय केलें ? त्याच्या वाडवडिलांनीं अशाप्रकारें वागूनच राजसेवा आणि जनसेवा केली आहे; आणि त्यांच्याकडूनच चामुंडरायाला हें सुशिक्षण मिळालें आहे.

**चामुंडराय**—माताजी, या सुशिक्षणाची महती त्यांना कशाला सांगतां, या शस्त्रास्त्र विद्येनें हिंसा होते असें सांगून हे नेहमीं आमच्याशीं वाद करीत असत.

**रत्न**—चामुंडराय तुह्मी त्या गोष्टी अजून विसरला नाहीं तर ! पण चामुंडराय, तुमच्याच मताचा विजय झाला आहे. क्षत्रियांनीं युद्ध करूं नये, हें ह्मणणें मूर्खपणाचें ठरेल. जैनधर्मांत तसें कोठेंच सांगितलें नाहीं. उलट आजपर्यंतचा भारताचा इतिहास पाहिला, तर मोठमोठे वीर जैनधर्मीच होते असें दिसून येतें. चक्रवर्ति भरत, सम्राट चंद्रगुप्त, सम्राट खारवेल, बिंबिसार वगैरे शेकडों जैनवीरांनीं युद्ध करून देशाचें स्वातंत्र्य उज्वल राखिलें आहे. आजही अनेक जैनवीर या गंगराज्याची सेवा करीत आहेत. ह्मणूनच जैनधर्माचा उज्वल ध्वज भारतवर्षांत फडकत आहे. माताजी—विद्यार्थीदशेंत केवळ मौज म्हणून आम्ही चामुंडरायांशीं वादविवाद करीत होतो तें अजूनही त्यांच्या लक्षांत आहे पहा !

**काललदेवी**--रत्न, जैनांच्या वीरश्रीनें भरलेला इतिहास तुम्हांला माहीत नाहीं असें थोडेंच आहे ?

**चामुंडराय**—मी आपला विनोदानें बोललों. माताजी यांनीं तर जैनवीरांच्या पराक्रमाची अत्यंत सुंदर काव्यें रचिलीं आहेत.

**काललदेवी**—होय कां ? कविराज, तर मग आम्हाला अद्याप नाहीं दाखविलीत तीं ? मला अशी कथाकाव्यें ऐकण्याची मोठी आवड आहे.

**चामुंडराय** - आणि म्हणून तर मी यांना इकडे घेऊन आलो आहे. हे आपलीं नवीं नवीं काव्यें दररोज आपल्याला ऐकवतील.

**काललदेवी**—मग तर ठीकच झालें. कविराज आपण आतां इथेंच राहून ग्रंथलेखन करूं लागा. आपल्या सहवासानें आम्हालाही धर्मज्ञान मिळेल.

**रत्न**—माताजी, आपल्या इच्छेनुसार होईल ती सेवा करण्यास माझी तयारी आहे. ( एक दूत येतो व नमस्कार करतो. )

**दूत**—वीरमार्तंड, प्रधानजींनीं आपल्याला हें पत्र दिलें आहे. मारसिंह महाराजांची प्रकृति फारच चिंताजनक असल्यामुळें आपल्याला अगदीं तांतडीनें बोलाविलें आहे.

**काललदेवी**—महाराजांची प्रकृती इतकी चिंताजनक आहे तर ? चामुंडराय, पहा बरं, काय आहे त्या पत्रांत.

**चामुंडराय**—( पत्र वाचून पहातो व निराशेनें )—महाराजांनीं अजितसेनाचार्यांजवळ सल्लेखना व्रत घेतलें असून त्यांची प्रकृती फारच अशक्त झाली आहे, असें यांत लिहिलें आहे; आणि पत्र देखत मला बोलाविलें आहे.

**काललदेवी**—असें आहे तर तुला आतां तावडतोब गेलेंच पाहिजे. जा, चामुंडराय महाराजांच्या अंत्यदर्शनाला तुला लवकर गेलें पाहिजे !

( चामुंडराय दूतासह निघून जातो. )

**रत्न**—अरेरे, महाराजांनीं सल्लेखना घेतली तर ! पण इतक्या लवकर बालराजावर सर्व भार टाकून सल्लेखना धारण करण्यांत महाराजांनीं घाई करायला नको होती.

**काललदेवी**—नाहीं, महाराजांनीं केलें आहे तेंच योग्य आहे. ते खरे वीर आहेत. खऱ्या वीराला कसल्याही स्वार्थाची अपेक्षा नसते. प्रत्येक मनुष्याला वृद्धापकाळ आणि मरण हें ठरलेलेंच आहे. तथापि डोळ्यांतून प्राण जाईपर्यंत कोणाचीही आशा सुटत नाहीं. परंतु खरे वीर इहलोकीचीं सर्व कर्तव्यें करून शेवटीं निर्मोही वृत्तीनें आत्मकल्याणाकडे वळतात.

**रत्न**—माताजी, आपलें म्हणणें अगदीं खरें आहे. इतक्या मोठ्या राज्याचा आणि वैभवाचा त्याग करून सल्लेखनाव्रत घेणें हें सामान्य मनुष्या-कडून होणें शक्य नाहीं. तें खऱ्या वीराचेंच काम आहे. [ चामुंडराय धनुष्य घेऊन सज्ज होऊन येतो. ]

**चामुंडराय**—माताजी, माझी सर्व तयारी झाली आहे. मी महा-राजांच्या दर्शनास जाऊन येतो. कविराज, मी परत येईपर्यंत आपण येथेंच माताजींच्या सान्निध्यांत रहा. [ चामुंडराय मातेचें दर्शन घेऊन जातो.]

**रत्न**—माताजी, आतां एकंदर परिस्थिति मोठी विकट होणार असें दिसतें. राजकुमार अल्पवयी असल्यामुळें सर्वत्र शांतता राहील कीं नाहीं याची शंकाच वाटते.

**काललदेवी**—न राहायला काय झालें, राज्याचा उत्कर्ष आणि दरारा केवळ राजावरच अवलंबून असतात असें नाहीं. मोठमोठ्या सरदार सामंतांच्या साह्यावरच राज्याचें निशाण निर्भयपणें फडकत असतें. राजा बालवयी असला तरी सर्वांनीं पूर्ववत् निष्ठेनें सेवाकार्य केलें तर गंगराज्याचें वैभव तिळमात्र कमी होणार नाहीं.

**रत्न**—पण, या स्वार्थी जगांत सगळेच लोक निष्ठावंत कुठें आहेत. ईर्षा, द्वेष, कपट, स्वार्थ आणि वृथाभिमानास बळी पडून प्रत्यहीं किती अनर्थ होत आहेत, हें आपण पाहात नाहीं कां ?

**काललदेवी**—तुमचें म्हणणें खरें आहे. तथापि तसा प्रसंगच आला, तर ज्या राज्याच्या उन्नतीसाठीं चामुंडरायाच्या वाडवडिलांनीं मनोभावें साह्य

केलें, त्याच गंगराज्याच्या रक्षणासाठीं चामुंडराय वाटेल तें कष्ट सहन करील.

**रन्न**—अहाहा, किती ही आपली राष्ट्रप्रीती ! आपल्यासारख्या श्रेष्ठ विचाराच्या निष्ठावंत माता जर प्रत्येकाला लाभल्या असत्या, तर जगांतील अन्यायाचा भार कमी झाला असता.

**काललदेवी**—कविराज, पूजेची वेळ झाली; चला तर आपण जिन-प्रभूच्या चरणीं हीच सद्भावना व्यक्त करूं. [पडदा]

---

## प्रवेश ४ था—

( स्थळ–बगीचा–किल्लेदार नृपकामाचा प्रवेश )

**नृपकाम**—काय करावें ? या पत्रानें कालपासून माझें मन द्विधा करून सोडलें आहे. स्वार्थ आणि कर्तव्य यांचें द्वंद्वयुद्ध अंतःकरणांत सुरू आहे. परंतु या युद्धाचा शेवट काय करायचा ? एकदां वाटतें अशा बिकट प्रसंगीं स्वामिद्रोह करणें हें नीचपणाचें कृत्य आहे; जग आपली छी थू करील; पण दुसऱ्याच क्षणीं हे सद्विचार नष्ट होऊन स्वार्थी विचारानें मन गोंधळून जातें; आणि अशी नामी संधी सोडली तर आपला उदय कधींही होणार नाहीं, असें वाटूं लागतें. क्षुद्र कीटकापासून तों मोठमोठ्या सम्राटांच्या जीवनाकडे पाहिलें तर हेंच दिसून येत नाहीं काय ? प्रत्येकाच्या वैभवाचे मनोरे दुर्बलांना पायाखालीं चिरडूनच उभारलेले असतात. मग मीच या कर्तव्यनिष्ठेच्या जाळ्यांत कां गुरफटावें ?......बस्स ! ठरला विचार, सामंत मुदुराचय्याला गुप्तरीतीनें साह्य करून आपला भाग्योदय करून घ्यायचा ! मारसिंह महाराजांनीं सल्लेखना व्रत घेतल्याचें जर खरें असेल तर या संधीचा फायदा घेऊन मलाही स्वतंत्र होतां येईल. माझ्या ताब्यांत हा बळकट किल्ला आणि बरीच फौजही आहे. यावेळीं सामंत मुदुराचय्याला जर साह्य केलें,

तर त्याच्या म्हणण्याप्रमाणें दोघांचेंही कल्याण होण्यासारखें आहे. पुरे झाली ही किल्लेदारी आणि आजन्म सेवाचाकरी ! नृपकामा खरोखरीचा नृप होण्याचें भाग्य घरीं चालून आलें असतां त्याला कां लाथाडतोस ! बस्स् हाच निश्चय ! आतां या क्षणींच या पत्राचें उत्तर पाठवून माझी संमती कळवितो. [जातो]

---

**प्रवेश ५ वा—**

[ स्थळ– दिवाणखाना, वृद्ध प्रधान व चामुंडराय बोलत आहेत. ]

**चामुंडराय**—प्रधानजी, इतक्या लवकर महाराजांचा अंत होईल असें कोणालाही वाटत नव्हतें. आपला निरोप मिळतांच मी निघालों. पण दुर्दैव हेंच कीं, महाराजांचें अंत्यदर्शनही घडलें नाहीं. याचेंच मला मोठें दुःख होत आहे.

**प्रधानजी**—चामुंडराय, आपल्याप्रमाणेंच सर्वांना मोठें दुःख होत आहे. महाराजांनीं सल्लेखना धारण केल्यामुळें त्यांचा अकालीं अंत होऊन गंगराज्यावर मोठा अनर्थ गुदरला आहे. अंतिम समयीं महाराजांनीं आपल्या भेटीची इच्छा दर्शविली, पण योगायोग हा असा होता. त्यांचा शेवटचा आदेश एकायला जरी तुह्मी हजर नव्हता, तरी महाराजांनीं मरतेसमयीं तुमच्यावर फार मोठी जबाबदारी टाकली आहे.

**चामुंडराय**—अरेरे, माझ्या अनुपम स्थितिमुळें महाराजांची निराशा झाली तर !

**प्रधानजी**—चामुंडराय, या अशा निराशेच्या संसारी व्यापांतून महाराज मुक्त झाले होते. मुनिसन्निध येऊन व्रत घेतल्यामुळें त्यांचा सर्व मोह नष्ट होऊन एकाद्या मुनीप्रमाणें त्यांनीं सर्वस्वाचा त्याग केला.

**चामुंडराय**—पण, महाराजांनीं माझ्याकरितां काय आज्ञा सांगितली आहे ?

**प्रधानजी**—चामुंडराय आजचा प्रसंग मोठा बिकट आला आहे. युवराज राजमल्ल तर अजाणच आहेत, त्यांना राजकारणाची बिलकूल माहिती नाहीं, मी तर असा वृद्ध झालेला, आतां आमच्या हातून काय होणार ? शिवाय सध्यां सैन्यबलही अगदींच कमी असून महाराजांच्या गैरहजरींत कोणीही नवीन सेनापतीची नेमणूक केलेली नाहीं. महाराजांनीं आजपर्यंत अनेक युद्धें करून शेकडों सामंतांना आशंकित केलें असल्यामुळें या संधीचा फायदा घेऊन कांहीं स्वार्थसाधू लोकांनीं बंड करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे.

**चामुंडराय**—काय ह्मणतां ? बंड करण्यापर्यंत या लोकांची मजल गेली आहे ? महाराजांच्या मृतदेहाला भस्म करणाऱ्या अग्नीच्या ज्वाला अजून पूर्ण विझल्या नाहींत तोंच या हरामखोरांनीं असा विश्वासघात चालविला आहे ? कोण, कोण आहेत ते हरामखोर ?

**प्रधानजी**—चामुंडराय, तुमच्या उसळत्या रक्ताला अनुसरून तुमचे हे उद्गार योग्यच आहेत, परंतु परिस्थितीचा विचार करतां आपल्याला फारच जपून वागलें पाहिजे. ज्या दिवशीं महाराजांनीं मुनिवासाकडे प्रयाण केलें, त्याच दिवसांपासून कांहीं धूर्त लोकांनीं आपलीं कारस्थानें सुरू केलीं आहेत. ज्यांनीं हें विद्रोहाचें कंकण बांधलें आहे, त्या सामंतांच्या हातीं सध्यां बरेंच मोठें सैन्यबल असल्यामुळें ते स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करीत आहेत, असें गुप्त हेराकडून कळलें आहे. ज्यांच्या आधारावर हा राज्यस्तंभ उभा आहे तेच जर डळमळूं लागले तर कसा निभाव लागणार ? या सर्व परिस्थितीचा विचार करूनच महाराजांनीं अंत्यसमयीं आपलें स्मरण केलें होतें. गंगराज्याचें सेनापतिपद आजपासून आपल्याकडे देण्यांत आलें असून राज्यरक्षणाची सर्व जबाबदारी त्यांनीं आपल्यावर सोंपविली आहे.

**चामुंडराय**—प्रधानजी, आपण सांगतां त्याप्रमाणें चारदोनच काय पण सर्व सामंत जरी विद्रोही बनले, तरी हा चामुंडराय जिवंत जीव असे-पर्यंत गंगराज्याचें रक्षण करण्यास तयार आहे. माझ्या वाडवडिलांनीं ज्या गंगराज्याची मनोभावें सेवा केली, ज्या राज्यांत जैनधर्माचा वैभवशाली झेंडा फडकत आहे, तें न्यायी गंगराज्य सुरक्षित राखणें हेंच माझें आद्यकर्तव्य आहे. महाराजांच्या अंतिम आशेची पूर्तता करण्यास आपल्यासारख्या अनुभवी प्रधानांचें जोपर्यंत साह्य मिळत आहे, तोपर्यंत मुळींच भिण्याचें कारण नाहीं.

**प्रधानजी**—शाबास, शाबास चामुंडराय, महाराजांनीं अगदीं योग्य अशाच रत्नाची पारख केलली पाहून मला मोठें समाधान होत आहे. पुलुगेरे प्रांताचा सामंत पंचलदेव, सामंत मुड्डराचय्य, सामंत वज्रदेव, किल्लेदार नृप-काम वगैरे बरेच सरदार विद्रोही बनले आहेत. लवकरच ते स्वतंत्र होण्या-साठीं बंड पुकारतील, आणि एकदां का हा प्रकार सुरू झाला तर मग अशा-प्रकारें राज्यद्रोह करणें हेंच प्रत्येकाला आवडूं लागेल. तेव्हां या बाबतींत—

**चामुंडराय**—सांगा, प्रधानजी सांगा, आपल्या अनुभवी सल्ल्याचा यावेळीं फारच उपयोग होणार आहे. आपण सांगाल त्याप्रमाणें योजना करण्याची माझी तयारी आहे.

**प्रधानजी**—त्या विद्रोही लोकांनीं जी कारस्थानें रचिलीं आहेत, तीं पाहून माझें धाबें दणाणलें आहे, परंतु प्रसंगाला तोंड तर दिलेंच पाहिजे. चामुंडराय, यावेळीं आपल्यासारखा उमदा तरूण जर मिळाला नसता तर गंगराज्याची मुळींच धडगत नव्हती.

**चामुंडराय**—ह्मणजे, या विद्रोही लोकांची इतकी पूर्ण तयारी झाली आहे !

**प्रधानजी**—होय ! ह्मणूनच ह्मणतो कीं प्रसंग मोठा आणिबाणीचा आहे. यावेळीं प्रथम आपल्याला बरेंच सैन्य एकत्र केलें पाहिजे. चारी बाजूनें बंडाचा वणवा पेटला तर त्यावेळीं भरपूर सैन्यावांचून शांतता राखणें कठीण होईल.

**चामुंडराय**—ठीक आहे, आजच या कार्याला प्रारंभ करणें जरूर आहे. आमचें स्वतःचें जें थोडेसें सैन्य आहे तें ताबडतोब इकडे घेऊन येण्यास कळवितो, आमच्या जहागिरींत आमच्याविषयीं लोकांत पूर्ण आदर असल्यामुळें, आणि माझा भाऊ नागवर्मा तिकडे व्यवस्था पहात असल्यामुळें नवीन सैन्य जमविण्यासही फारशी अडचण पडणार नाहीं.

**प्रधानजी**—चला तर आजच नागवर्माला निरोप पाठवून पुढील व्यवस्था पाहूं. ह्मणजे या कारस्थानी लोकांचा पूर्ण बंदोबस्त करतां येईल.

---

## प्रवेश ६ वा—

[ स्थळः—राजवाडा, वज्रदेव आणि जयपाल युद्धवेशांत उभे आहेत. ]

**वज्रदेव**—जयपाल, तुझ्या सल्याप्रमाणें सर्व तयारी तर झालीच आहे. तूं मोठा कारस्थानी आहेस यांत शंका नाहीं. तुझ्या या दूरदर्शित्वामुळें आपलें उद्दिष्ट साध्य होणार अशीच शुभचिन्हें दिसत आहेत.

**जयपाल**—दिसत आहेत ? अजूनही शंका वाटते आपल्याला ? महाराज मी जीं कारस्थानें रचिलीं आहेत, त्याची आपल्याला कल्पनाही नाहीं. आपण तर पूर्वतयारी केली आहेच, पण इतर अनेक सरदारांनाही गुप्त पत्रें पाठवून या संधीचा फायदा घेऊन स्वतंत्र होण्याचा इषारा दिला आहे.

**वज्रदेव**— ह्मणजे ? हें काय ह्मणतोस जयपाल ? सगळयांनाच स्वतंत्र होण्याची चिथावणी दिली आहेस, मग आपलें महत्व तें काय राहिलें ? जयपाल चुकलें तुझें हें धोरण. अरे कोणालाही कळण्यापूर्वींच जर आपण हल्ला चढविला असतां, तर विजयाची शंभर टक्के आशा होती. पण—पण—आतां—

**जयपाल**—आतां काय ? महाराज या जयपालच्या हातून अशी चूक होईल ह्मणतां ? नाहीं, पण माझें कारस्थान आपल्याला समजलें नाहीं. जर कोणालाही न कळवितां आणि प्रत्येकाच्या मनांत या स्वार्थबुद्धीची प्रेरणा न करतां आपण हल्ला चढविला असतां, तर सर्व सामंत एकत्र होऊन आपल्या-विरुद्ध तुटून पडले असते; आणि राजा होण्याऐवजीं या वज्रदेवाला फांसावर लटकावें लागलें असतें. पण आतां तसें होणार नाहीं ! प्रत्येकाला स्वतंत्र होण्याची आशा लागल्यामुळें आपण हल्ला केल्यानंतर गंगराज्य रक्षणासाठीं कोणीच धाऊन येणार नाहीं. परभारेंच तें राज्य नष्ट झाल्याचें पहाण्यास जो तो टपून बसलेला दिसेल.

**वज्रदेव**—आलें, सर्व कांहीं लक्षांत आलें, जयपाल, खरोखरच तूं मोठा बुद्धिमान आहेस. तूंच माझा प्रधान होण्याला लायख आहेस. या बेबंदशाहींत गंगराज्यावर हल्ला करून तें हस्तगत केलें ह्मणजे मग घेतो एकेका सामंताचा समाचार ! जयपाल आहेस खरा कारस्थानी वीर.

**जयपाल**—हेंच तर मी ह्मणतो आहे. पण तें लवकर आपल्या ध्यानीं आलें नाहीं.

**वज्रदेव**—अरे जयपाल, आह्मी राजे लोक जर इतके बुद्धिमान होऊं लागलों, तर मग तुझ्यासारख्या प्रधानाचें काय काम ?

**जयपाल**—बरें तें जाऊं दे, पण महाराज आतां आपल्याला पुढील तयारीला लागलें पाहिजे. गंगराज्यांत यावेळीं सर्वत्र शिथिलता पसरली आहे तोंच आपण हल्ला चढवून दोघां राजपुत्रांना आणि त्या थेरड्या प्रधानाला कैद केलें पाहिजे. ह्मणजे झालें आपलें काम. विजयश्री आपलीच आहे. चला तर लवकरच बाहेर पडलें पाहिजे.

**वज्रदेव**—तें पहा रणशिंग फुंकू लागले सर्व सैन्य अगदीं तयार आहे. आतां हा वज्रदेव कोणाचा सामंत राहिला नाहीं. गंगराज्य विजेता

सम्राट वज्रदेव जयजयकारानें घुमणाऱ्या घोषांतच पुन्हां या नगरांत प्रवेश करील. [ तलवार उपसून त्वेषानें जातो. ]

**जयपाल**—वज्रदेव तूं राजा होणार आहेस, पण याचें सर्व श्रेय या जयपालास आहे, हें विसरूं नकोस, तरच तुझें हें राज्यपद सुखावह होईल. [ जातो. ]

---

## प्रवेश ७ वा.—

[ स्थळ:——राजवाडा, चामुंडराय व प्रधान बसले आहेत. ]

**चामुंडराय**- अखेर आपलाच कयास बरोबर ठरला. या दुष्ट हरामखोरांनीं स्वार्थांध होऊन जीं कारस्थानें सुरू केलीं आहेत तीं एकून मी देखील थक्कच झालो आहे. रोज एक नवीन वार्ता आणि एका विद्रोहाचें कूट कारस्थान उघडकीस येत आहे. विश्वासघात, कपट, स्वामिद्रोह आणि दुष्टता यांनींच सर्व जग भरून गेलें आहे कीं काय अशी शंका वाटू लागते.

**प्रधानजी**—या सर्व गोष्टींची मला पूर्ण कल्पना होती, ह्मणूनच मी आपल्याला मोठ्या सावधगिरीनें वागण्याचा सल्ला दिला होता. वज्रदेव, मुडुराचय्य, नृपकाम, त्रिभुवनवीर, आणि पंचलदेव वगैरे सरदार विद्रोहांत उघडपणें सामील झाले आहेत; आणि लवकरच राजधानीवर कोणाचातरी हल्ला होण्याचा संभव आहे. तसें झालें तर मोठा आणिबाणीचा प्रसंग येणार आहे.

**चामुंडराय**—ह्मणून तर मी माझें सर्व सैन्य एकत्रित केलें आहे. तिकडे माझा विश्वासू सेवक गोविंदमय्य नवीन सैन्य भरतीचें काम करीत आहे. त्यामुळें आपल्याला फारशी अडचण भासणार नाहीं. शिवाय येथें असलेलें महाराजांचें सर्व सैन्यही मी आपल्या हुकमतीखालीं आणलें आहे.

**प्रधानजी**—चामुंडराय, इतक्या थोड्या अवधींत तुम्ही ही जी तयारी केली याबद्दल मला मोठा आनंद होत आहे. तथापि येवढ्यावरच विसंबून भागणार नाहीं. न जाणो विद्रोही लोकांनीं जोराची चढाई केली तर त्यांना यशस्वी रीतीनें तोंड देण्याला याहूनही अधिक तयारी केली पाहिजे.

(एक दूत येतो.)

**दूत**—फितुरी लोकांनीं राजधानीवरच हल्ला करण्याचा बेत केला आहे. सामंत वज्रदेव, नृपकाम वगैरे दोघातीघांचें सैन्य एकत्र जमलें असून तें मोठ्या धिटाईनें चालून येत आहेत अशी वार्ता आहे. याहूनही अनिष्ट वार्ता म्हणजे पंचलदेवासारखे सामंत स्वतंत्र झाल्याची घोषणा करीत आहेत; आणि कदाचित् राजकुमारांनाहीं कैद करण्याचा त्यांचा विचार दिसतो. गंगराज्याचा उच्छेद करण्याची जणूं काय त्यांनीं प्रतिज्ञाच केली आहे.

**प्रधानजी**—पाहिलेंत चामुंडराय, मी काय म्हणत होतो त्याची आली ना प्रचीती ? आतां आपल्याला अधिक विचारानेंच पुढें पाऊल टाकलें पाहिजे. न जाणों दुर्दैवानें जर विद्रोह्यांचा नगरांत प्रवेश झाला, तर काय अनर्थ होईल हें सांगतां येत नाहीं.

**चामुंडराय**—असें आहे तर राजकुमारांना कोठेंतरी सुरक्षित स्थळीं पोंचविण्याची जरूरी आहे. अशा प्रसंगीं त्यांच्या जिवास जर कांहीं धोका पोंचला, तर आपले सर्व प्रयत्न मातीमोल होतील.

**प्रधानजी**—मी तर त्याच गोष्टीच्या विचारांत आहे. राजपुत्रांना सुरक्षित स्थळीं नेऊन ठेवलें पाहिजे हें खरें आहे पण असें स्थळ कोणतें, हेंच समजेना. मी येथें राहून नगर रक्षणाची व्यवस्था पाहीन, आणि तुम्ही शत्रूंच्या हल्ल्याचा प्रतिकार करण्यांत गुंतून जाल, पण या राजपुत्रांना कोणाच्या स्वाधीन करावें याचाच मोठा पेंच पडला आहे.

**चामुंडराय**—याबद्दल आपण बिलकूल काळजी करूं नका. हा चामुंडराय जिवंत असेपर्यंत राजपुत्रांच्या नखालाही धक्का लागूं देणार नाहीं.

सरदार लोकविद्याधर आणि त्यांची पत्नी सावियब्बा ही अत्यंत विश्वासू आहेत. त्यांच्याकडे हें कार्य सोंपविले तर आपणांस पूर्णपणें निर्धास्त होतां येईल.

**प्रधानजी**—चामुंडराय अगदीं योग्य असें स्थळ आपण शोधून काढलें. सरदार नायक याची कन्या सावियब्बा ही मोठी कर्तबगार आणि विश्वासू स्त्री आहे. तिकडेच आतां कुमारांना गुप्तरीतीनें पाठवून देऊं. चामुंडराय, आतां मी पूर्णपणें निर्धास्त झालो. यावेळीं आपल्यासारखा कर्णधार जर मिळाला नसता तर गंगराज्याचें हें जीर्ण जहाज कुठल्या खडकावर आपटून याचा चुराडा झाला असतां कोण जाणें ! चला आतां प्रथमतः राजकुमारांना तिकडे पोंचविण्याची व्यवस्था करूं. ( जातात. )

---

## प्रवेश ८ वा—

[ स्थळः—राजवाडा, महाराणी चिंतित बसली आहे. ]

**राजमाता**—भगवान, अशाप्रकारें एकामागून एक संकटपरंपरा कोसळून इतकें दुःख भोगण्यासारखें मी कोणतें पातक केलें होतें ! त्यांचा मृत्यु होऊन एक महिनाही लोटला नाहीं, तोंच अनेक सरदार, सामंत विद्रोही बनून राजधानीवर हल्ला करण्यास तयार झाले आहेत. माझी नसली तरी या गंगराज्याची पुण्याईदेखील संपुष्टांत आली काय ! सोन्यासारखे राजकुमार वैभवानें दिपणाऱ्या या राजधानींत सुखसागरांत पोहत राहिले असते. पण त्यांनाच आज काय प्रसंग आला आहे पहा ! पित्याचें छत्र नाहींसें होतांच या बालचंद्रांना ग्रासण्याकरितां अनेक कालराहू वेगानें आक्रमण करीत आहेत... .....अगबाई, पण हे कुमार कुठें गेले ! कालच

प्रधानजींनी बजावून सांगितलें आहे ना ! कीं राजपुत्रांच्या जिवालाही धोका होण्याचा संभव आहे म्हणून. मग कुठें गेले हे कुमार ! पण या कुमारांच्या रक्षणाला मी एकटीच समर्थ आहे कां ? जिथें आकाशच फाटलें आहे तिथें मी हात लावून काय होणार आहे ! परमेश्वरा गंगराज्याची ही भंगलेली नौका तूंच तारणार आहेस......( हात जोडते तोंच प्रधान व चामुंडराय येतात.)

**प्रधानजी**—महाराणीसाहेब, आपण असा खेद करीत बसून कसें चालेल ? दिवसेंदिवस परिस्थिति फारच बिकट होत आहे; आणि तुम्ही तर अशा शोकमग्न असतां, पण राजकुमार कुठें दिसत नाहींत? मी कालच तुम्हांला बोललो होतो ना ! त्यांच्या बाबतींत अधिक दक्षता बाळगायला ?

**राजमाता**—होय ! प्रधानजी आपण बोलला होता. पण त्यांचें रक्षण करण्यास चामुंडरायासारखे वीर सेनानायक आणि स्वतः आपण डोळ्यांत तेल घालून रात्रंदिवस जागरूक असतां मीच काय करणार आहे ? माझ्या सर्व आशा फलद्रूप करणें आपल्याच हातीं आहे !

**चामुंडराय**—राजमाता, आपण म्हणतां त्याप्रमाणें आम्हीतर जिवापाड प्रयत्न करीत आहोतच. परंतु हे विद्रोही लोक राजधानीवरच चाल करून येत असल्याचें कळतें. कदाचित् त्यांचा नगरांत प्रवेश झाला तर राजकुमारांच्या जिवाला धोका पोंचण्याचाही संभव आहे. त्याकरितां शत्रूंचा पुरा मोड होई-पर्यंत त्यांना दुसऱ्या कोठेंतरी सुरक्षित स्थळीं पोंचविणें जरूर आहे. आतां एका क्षणाचाही विलंब करणें धोक्याचें आहे.

**प्रधानजी**—आमचे विश्वासू सरदार लोकविद्याधर यांचेकडे कुमारांना पोंचविल्यास आम्ही अगदीं निर्धास्त होऊं ! याबाबतींत आपली काय आज्ञा आहे ?

**राजमाता**—आपण अगदीं योग्य असेंच स्थळ शोधून काढलें आहे. आपल्या इच्छेनुरूप वाटेल ती व्यवस्था करावी.

(एक दूत नमस्कार करून)

**दूत**—दंडनायक, शत्रुसैन्य अगदीं जवळ येत असल्याची वार्ता आली आहे.

**चामुंडराय**—पाहिलंत प्रधानजी, आतां एक क्षणाचाही विलंब उपयोगी नाहीं. ( दूतास ) जा, तूं सैन्याधिकाऱ्यांना भेटून सर्व सैन्य सज्ज ठेवण्यास सांग. हा मी आलोच. चला प्रधानजी आपण कुमारांना लवकर पोंचविण्याची व्यवस्था करा.

**प्रधानजी**—ठीक आहे. राणीसाहेब, चला आपण तिकडेच जाऊन कुमारांना वेषांतर करून गुप्तपणें पाठवूं. ( दोघे जातात, व पडद्यांत रण-वाद्यांचा आवाज होतो. )

**चामुंडराय**—हा पहा रणवाद्यांचा आवाज ऐकूं येत आहे. सैन्य तर तयारच आहे. जय वीर! ( तरवार उपसून त्वेषानें जातो. )

**= अंक १ ला समाप्त. =**

---

# अंक २ रा.

## प्रवेश पहिला—

[ स्थळ—जंगल, जयपाल एकटा भटकत आहे. ]

**जयपाल**—जगांत प्रत्येक व्यक्तीच्या सगळ्याच आशा फलद्रूप झाल्या असत्या तर दुःखाचे दीर्घ सुस्कार टाकणारे हजारो लोक मुळींच दिसले नसते. दूर कशाला हा जयपाल तरी असा रानांवनांतून मुळींच भटकत फिरला नसता. गंगराज्य उध्वस्त करून प्रधानपद मिळवावें म्हणून मी वज्रदेवाला हातीं धरून अनेक कारस्थानें केलीं. पण चामुंडरायासारखा महान् योद्धा गंगराज्यरक्षणाला पुढें आल्यामुळें आमचा सर्व व्यूह ढासळून गेला; आणि नाहक वज्रदेव प्राणास मुकला. त्यानंतर पंचलदेवासारख्या महासामंताच्या आश्रयाला जाऊन त्याला पूर्णपणें विरोधी बनविला. पंचलदेवानें तर माझ्या सल्ल्याप्रमाणें आपण स्वतंत्र झाल्याची घोषणाही केली. पण वीरमार्तंड चामुंडरायापुढें त्याचाहि निभाव लागला नाहीं. तथेंही प्रधानपद बळकावण्याची माझी आशा धुळीस मिळाली; आणि जीव बचावून असा सध्यां भटकतो आहे. वाळूवर बांधलेलें मंदिर ढासळावें किंवा कांचेच्या घराचा एका आघाताबरोबर चुराडा व्हावा, त्याप्रमाणें माझ्या सर्व आशा-आकांक्षा मातीमोल झाल्या आहेत. जणूं काय दैवानेंच माझी परीक्षा पहाण्याचें ठरविलें असावें. पण हा जयपाल अशा संकटांना भिऊन ध्येयच्युत होण्यासारखा नामर्द नाहीं. जोपर्यंत या जयपालाच्या धडावर हें डोकें शाबूत आहे तोपर्यंत वाटेल ती कारस्थानें करून, कुठल्या तरी राज्याची सूत्रें आपल्या हातीं घेतल्या-शिवाय स्वस्थ बसणार नाहीं! यापूर्वी दोन वेळां अयशस्वी झालेला हा जयपाल तिसऱ्या वेळीं पूर्णपणें यशस्वी झाल्यावांचून राहाणार नाहीं. जें गंगराज्य

लयास चाललें होतें, त्याच राज्याचा पाया चामुंडरायानें बळकट केला आहे. चामुंडरायासारख्या धाडशी वीराला माझ्यासारख्या बुद्धिमान् प्रधानाची जोड लाभली तर दोघांच्याही कर्तबगारीचा गौरव होईल. माझे मनोरथ पूर्ण होण्यासारखें स्थळ गंगराज्यच आहे ! तेथील वृद्ध प्रधानाची जागा पटकावणें म्हणजे या जयपालाच्या हातचा मळ आहे ! (जातो)

---

## प्रवेश दुसरा—

[ स्थळः---राजवाडा, गंगराजाचा दरबार भरला आहे. सिंहासनावर राजमल्ल व सभोंवार प्रधानजी, चामुंडराय, रक्कसगंग, कवि रत्न व इतर सरदार बसले आहेत. ]

**प्रधानजी**—सरदार सामंतहो, गंगकुलभूषण राजमल्ल महाराजांचा आज हा पहिला दरबार भरला आहे. राहूच्या जबड्यांतून सुटलेला चंद्र ज्याप्रमाणें अधिकच तेजस्वी दिसतो त्याचप्रमाणें अनेक संकटांतून निभावून आपल्या सर्वांच्या साह्यानें महाराजांचा राज्याभिषेक समारंभ निर्विघ्नपणें पार पडला. आणि आजच्या शुभमुहूर्तावर हा पहिला दरबार भरविण्याचा सुयोग प्राप्त झाला; आपल्या सर्वांच्या एकनिष्ठ सेवेबद्दल स्वतः महाराज आपला गौरव करणार आहेतच, तथापि याप्रसंगीं दंडनायक चामुंडराय यांच्या नांवाचा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं. मारसिंह महाराजांच्या समाधी-मरणाची वार्ता कळतांच चोहोंबाजूंनीं बंडाचा जो वणवा पेटला, त्यांत गंगराज्य सुरक्षित राहील कीं नाहीं अशीदेखील शंका वाटत होती. फार काय पण खुद्द राजमल्ल महाराजांचें जीवनही तितकेंच धोक्याचें झालें होतें. अशा कठीण प्रसंगीं धैर्यानें पुढें येऊन चामुंडरायांनीं जर तरवार गाजविली नसती,

आणि गंगराज्यरक्षणाचें कंकण बांधलें नसतें तर आपणाला हा सुदिन पहायला मिळाला नसता. दंडनायकाप्रमाणें आपण सर्वांनींही साह्य केल्यामुळे माझ्यावरील जबाबदारी यशस्वी रीतीनें पार पडली आहे. यापुढें अशाच एकनिष्ठेनें आपण गंगराज्याचें वैभव वृद्धिंगत कराल अशी आशा बाळगतो.

**चामुंडराय**—वीरहो, प्रधानजींनीं आपल्या सर्वांच्या कृतीचा अत्यंत गौरव केला आहे. परंतु आम्हीं सर्वांनीं आपलें कर्तव्य बजावण्यावांचून अधिक असें कांहींच केलें नाहीं. या यशाचें सर्व श्रेय वृद्ध प्रधानजीनाच आहे. त्यांच्या अनुभवी मार्गदर्शनामुळेंच आम्हीं सर्व प्रसंगांतून पार पडलो.

**राजमल्ल**—दंडनायक, आपलें म्हणणें अगदीं खरें आहे, पिताजींच्या मृत्यूनंतर निर्माण झालेल्या त्या बिकट परिस्थितींतून मोठ्या चातुर्यानें त्यांनीं गंगराज्याचें रक्षण केलें आहे. तथापि त्यांच्या सदिच्छेला जर आपल्या कर्तृत्वाची जोड मिळाली नसती तर त्यांचे प्रयत्न अयशस्वी ठरले असते. आपण सर्वांनींच या गादीचें रक्षण करण्यासाठीं अविश्रांत प्रयत्न केलें आहेत. म्हणूनच मला या गादीवर पाऊल टेवतां आलें. आपल्या या अनुपम सेवे-बद्दल आपला कसा गौरव करावा हेंच मला कळत नाहीं. पिताजींच्या अंतिम इच्छेप्रमाणें वीरमार्तंड चामुंडरायांनीं सेनापतीपद स्वीकारून थोडयाच अवधींत अनेक शत्रूंना निःपात केला, वज्रदेव, पंचलदेव वगैरे मोठमोठ्या सामंतांना धुळीस मिळवून गंगराज्याचा पाया भक्कम बसविला. या त्यांच्या वीरकृतीबद्दल त्यांना आम्हीं " समरधुरंधर " ही पदवी अर्पण करीत आहोत.

**कवि रत्न**—महाराजांनीं ' समरधुरंधर ' ही बहुमानाची पदवी देऊन चामुंडरायांचा जो गौरव केला आहे, तो योग्यच आहे.

**राजमल्ल**—त्याचप्रमाणें त्यांना याचप्रसंगीं ही तलवारही बक्षीस द्यावयाची आहे. ही अत्यंत प्रभावशाली व असामान्य अशी तलवार असून तिचा इतिहास फार महत्वाचा आहे. प्रधानजींना त्यासंबंधीं पूर्ण माहिती असल्यामुळें तेंच आपल्याला सर्व हकीगत सांगतील.

**प्रधानजी**—समरधुरंधर चामुंडरायांच्या राजसेवेचा गौरव करण्या-करितां महाराजांनीं ही जी तलवार बक्षीस देण्याचें ठरविलें आहे, ती असामान्य अशीच आहे आणि ती धारण करणारा वीर देखील असाच समरधुरंधर असावा लागतो. ह्मणूनच महाराजांनीं या महान् पराक्रमी वीराला ही तलवार देण्याचें जाहीर केलें आहे. गंगराज्यसंस्थापक दिदिग आणि माधव यांना ज्या सिंहनंदी आचार्यांचा शुभाशिर्वाद मिळाला होता, त्याच आचार्यांनीं देवीचा प्रसाद ह्मणून ही तेजस्वी तलवार दिली होती. तेव्हांपासून गंगवंशांतील वीर पुरुष ही तलवार धारण करीत आहेत. याच तरवारीनें मारसिंह महाराजांनीं अनेक शत्रूंचा पराभव केला होता. अशी ही वीरांचें भूषण असलेली तेजस्वी तलवार धारण करण्याला योग्य असाच नीतिमान्, पराक्रमी आणि कुशल सेनानी महाराजांना लाभला आहे. आजपर्यंत गंगवंशांतील राजपुरुषांच्या हातीं असलेलें हें शस्त्र आज चामुंडरायांना देण्याची महाराजांनीं जी उदारता दाख-विली यावरूनच त्यांची गुणग्राहकता दिसून येते.

**राजमल्ल**—या तरवारीचा हा स्फूर्तिप्रद इतिहास आपण आतांच ऐकला, ही वस्तु शोभेची नसून दुर्बलांचें रक्षण करण्याकरितां वीरांनीं हातीं घ्यावयाची असते. म्हणूनच ही देव्हाऱ्यावर न ठेवतां ज्यांनीं आपल्या बाहु-बलानें आमचें रक्षण केलें आहे, त्या वीर पुरुषाच्या स्वाधीन करीत आहे. ही चामुंडरायांच्याच हातीं अधिक शोभून दिसेल. दंडनायक, ही घ्या, ही अमूल्य वस्तू मी आपल्या स्वाधीन करीत आहे. ( चामुंडराय तरवार घेतो. )

**चामुंडराय**—महाराजांनीं अत्यंत उदार अंतःकरणानें ही अमूल्य वस्तु देऊन माझा फार मोठा गौरव केला आहे. तथापि या देणगी बरोबरच माझ्यावर जी एक जबाबदारी येऊन पडली आहे तिचें मला कधींही विस्मरण होणार नाहीं. या प्रभावशाली तलवारीचा स्वीकार करून मी या गादीपुढें अशी प्रतिज्ञा करतो कीं, ' ही तलवार माझ्या हातीं आहे तोपर्यंत गंगराज्याचें

रक्षण करण्यांत आणि तिचा गौरव वाढविण्यांत मी यत्किंचितही कसूर करणार नाहीं.'

**रक्कसगंग**—अहाहा! समरधुरंधर चामुंडरायांची ही प्रतिज्ञा ऐकून माझें अंतःकरण आनंदानें फुलून गेलें आहे. त्यांनीं केलेल्या महत्कार्याबद्दल ही तरवारच काय पण हें गंगराज्यदेखील त्यांना अर्पण केलें तरी तेंही अपुरेंच पडणार आहे. वीरवर चामुंडरायांच्या हातून ही राजसेवा अधिकाधिक यशस्वी होत जावो हीच माझी श्रीजिनेश्वरचरणीं प्रार्थना आहे.

**राजमल्ल**—त्या आणीबाणीच्या प्रसंगीं चामुंडराय इकडे शत्रूंशीं सामना करण्यांत गुंतले असतां तिकडे सदैव आमच्या सन्निध राहून रन्न कवींनीं आमचा अज्ञातवास सुखकर केला. त्यांनीं लिहिलेलीं अनेक सुंदर काव्यें आह्यांला फारच आवडलीं. त्याचप्रमाणें राज्याभिषेकसमयीं त्यांनीं मंगलगीत गाऊन आपली शुभेच्छा व्यक्त केली आहे. आजच्या शुभप्रसंगी आह्मीं त्यांना राजकविपद देऊन त्यांचा गौरव करीत आहोत.

**कवि रन्न**—महाराजांनी दिलेल्या बहुमानाचा स्वीकार करून सदैव गंगराज्याच्या सेवेंत राहण्यास मला मोठा आनंद वाटतो.

**प्रधानजी**—महाराज, आतां वेळ बराच झाल्यामुळें यापुढील बक्षिसाचा कार्यक्रम उदईक केल्यास ठीक होईल.

**राजमल्ल**—ठीक आहे. चला तर, इतरांना ठरल्याप्रमाणें उदईक बक्षिसें देण्यांत येतील. ( महाराजांचा जयजयकार करतात, पडदा पडतो.)

---

## प्रवेश ३ रा—

[ स्थळ—दिवाणखाना—सामंत मुडुराचय्य युद्धवेशांत येत आहे. ]

**मुडुराचय्य**—या चामुंडरायानें तर आमचे सर्व बेत धुळीस मिळविण्याचा जणूं काय चंगच बांधला आहे. नुकत्याच आलेल्या बातमीवरून असें समजतें कीं, त्यानें आपला भाऊ नागवर्मा याजबरोबर बरेंच मोठें सैन्य

देऊन इकडे पाठविलें आहे; आणि तो स्वतः उच्छंगी किल्ला सर करण्या-करितां गेला आहे. पण चामुंडराया हा राचय्य तसा लेचापेचा नाहीं समजलास ! चारदोन निर्बल सामंतांना तूं धूळ चारलीस ह्मणून असा शेफारून जाऊं नकोस. नागवर्मच काय पण स्वतः तूं जरी आलास तरी तुला स्वर्गाचा मार्ग दाखवायला हा राचय्य तयार आहे. पंचलदेवाप्रमाणें उतावीळपणानें मी स्वतंत्रतेची घोषणा केली नसून सर्व दृष्टीनें तयारी करूनच ही तरवार म्यानांतून बाहेर काढली आहे. येऊं दे त्या नागवर्माला ! त्याचें डोकें असें ठेचतो कीं पुन्हां या राचय्याच्या वाटेस येण्याची कोणाचीही छाती होणार नाहीं.

**एक शिपायी**—महाराज, नागवर्माचें सैन्य अगदींच जवळ आलें असल्याची वार्ता आली आहे.

**मुडुराचय्य**—येऊं दे, चांगला जवळ येऊं दे, त्याला असा वेढून टाकतो कीं त्याच्या एकूण एक सैन्याची कत्तलच झाली पाहिजे. बिचाऱ्या नागवर्मा ये, हा पहा मृत्यूचा जबडा तुझ्याकरितां तयार आहे.

( त्वेषानें जातो. )

---

**प्रवेश ४ था—**

( स्थळ—राजवाडा-राजमल्ल व त्याची माता बोलत आहेत. )

**राजमाता**—राजमल्ल, सध्यां चामुंडराय ज्या युद्धावर गेले आहेत तिकडची कांहीं हकीगत समजली कां ?

**राजमल्ल**—विशेष हकीगत कांहीं कळली नाहीं. परंतु आतांपर्यंत आलेल्या बातमीवरून पहातां चामुंडरायानें उच्छंगी किल्ल्याला वेढा घातला असून शत्रूचा चांगलाच कोंडमारा झाला आहे; आणि इकडे मुडुराचय्यावर चामुंडरायाचा भाऊ नागवर्म गेला असून बगेयूरच्या रणभूमीवर दोघांची घनघोर लढाई सुरू आहे असें कळतें.

**राजमाता**—राजमल्ल, किती किती या चामुंडरायाचे आमच्यावर उपकार होत आहेत ! खरोखरच तो वीरपुरुष या पडत्या काळांत साह्याला आला नसतां तर न जाणो गंगराज्याचें नांवही ऐकूं आलें नसतें. चोहोंबाजूंनीं असा बंडाचा वणवा पेटला असतां चामुंडरायांनीं मोठ्या धैर्यानें आमचें रक्षण केलें आहे.

**राजमल्ल**—होय ! आईसाहेब आपण ह्मणतां त्याप्रमाणें चामुंडरायानेंच आपल्या राज्याचें पुनरुज्जीवन केलें, असेंच ह्मटलें पाहिजे. पिताजींच्या मृत्यू-नंतर धुमाकूळ घालणाऱ्या अनेक शत्रूंचा त्यांनीं पाडाव केला आहे; आणि एकामागून एक विजय मिळवून आपल्या राज्याचा लौकिक वाढविला आहे. पंचलंदवाचा पराभव करून त्यांनीं आमच्यावरील एक मोठेंच संकट दूर केलें आहे.

**राजमाता**—तिकडे पंड्डूरच्या सीमाप्रांतावर शांतता झाली आहे काय ?

**राजमल्ल**—रक्कसगंग तिकडे गेल्यापासून पूर्ण शांतता झाली आहे. पिताजींच्या सहवासांत रक्कसगंगला राजकारणाचें चांगलेंच ज्ञान झालें आहे. त्यानें सीमाप्रांतावरील एकदोन किल्लेदारांना जिंकून चांगला दरारा बसविला आहे.

**राजमाता**—कुमार रक्कस आहेच तसा हुषार ! वयानें इतका लहान असूनही त्यानें जें कार्य केलें आहे तें पाहून मला किती आनंद होत आहे ह्मणून सांगूं ? बाळ रक्कसला कधीं एकदां पाहीन असं झालं आहे. ( समोर पाहून ) हे कोण प्रधानजीच इकडे आले वाटतं ?

**राजमल्ल**—प्रधानजी आले ? मग कांहीं तरी नवीन वार्ता कळेल ?

( प्रधानजी येतात. )

**प्रधानजी**—महाराज, चामुंडरायानें उच्छंगीच्या किल्लेदाराला यमसदनास पाठवून त्या अजिंक्य किल्ल्यावर आपला ध्वज फडकविला आहे.

मात्र अद्याप नागवर्माकडील कांहींच हकीगत कळत नाहीं. किल्ला सर करून चामुंडराय राजधानीकडे परत येत आहेत अशीही वार्ता आहे.

**राजमाता**—प्रधानजी, या समरधुरंधर चामुंडरायाच्या वीरकृतीचें किती कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. आह्मी इतक्यांत त्यांच्यासंबंधींच बोलत होतो. तोंच आपण ही शुभवार्ता घेऊन आला.

**राजमल्ल**—किल्ला सर करण्याबद्दल मला विशेष काळजी वाटत नव्हती. पण मुडुराचय्यावर गेलेल्या नागवर्माकडील कांहींच हकीगत समजली नसल्यामुळें एकसारखी हुरहूर वाटत आहे. ( जयपाल प्रवेश करतो.)

**राजमल्ल**—जयपाल अगदीं योग्यवेळीं आलास, प्रधानजींना मी तुझी ओळख करून देणार आहे. प्रधानजी तुह्मांला मी ज्याच्याबद्दल माहिती सांगणार होतो तो हा जयपाल, अलिकडे एकदोन महिन्यांत हा आमच्या सेवेला आहे. मनुष्य मोठा हुषार आहे. राजकारणांतही चांगला निपुण दिसतो. त्यामुळें आपल्याला याची चांगलीच मदत होईल असें वाटतें.

**प्रधानजी**—इथें महाराजांच्या सेवेला येण्यापूर्वी आजपर्यंत कोठें होतां आपण ?

**जयपाल**—मी–मी होतो, असाच देशाटन करीत होतो. अध्यात्म-शास्त्राकडे प्रथमपासूनच माझा ओढा असल्यामुळें अनेक साधूंच्या सहवासानें तीर्थयात्रा करीत फिरत होतो. परंतु अनेक देशांत मिळालेल्या अनुभवाचा या राजकारणांत उपयोग करून नंतरच संन्यासमार्ग पत्करावा ह्मणून महाराजांच्या सेवेला आलो आहे.

**प्रधानजी**—( न्यहाळून पहात ) हं...ठीक आहे.

**राजमल्ल**—तसें पाहिलें तर हा फारच तीक्ष्ण बुद्धीचा आहे. प्रत्येक बाबतींत मोठी अचूक सल्ला देतो.

[ **पडद्यांत**—समरधुरंधर चामुंडरायांचा विजय असो. ]

**प्रधानजी**—विजयी वीरमार्तंडाची स्वारी आलीच वाटते. त्यांचाच विजयघोष ऐकूं येत आहे.

**राजमाता**—मला तर या विजयी वीरमार्तंडाला केव्हां एकदां डोळे भरून पाहीन असें झालें आहे.

[ चामुंडराय येतो व राजमातेस वंदन करितो. ]

**राजमाता**—समरधुरंधर शतायु व्हा, आणि आपल्या बाहुबलानें या गादीचें वैभव असेंच वृद्धिंगत करा. हीच माझी शुभेच्छा आहे.

**राजमल्ल**—वीरवर, आपल्या या अतुल पराक्रमानें माझें अंतःकरण आनंदोर्मीनें प्रफुल्ल झालें आहे. अजिंक्य समजला जाणारा उच्छंगीचा किल्ला जिंकून आपण गंगराज्याचा ध्वज वैभवशाली बनविला आहे. या विजयाबद्दल मी आपल्याला—' **रणरंगसिंह** ' ही पदवी अर्पण करीत आहे.

**प्रधानजी**—गंगराज्याचे खरे आधारस्तंभ रणरंगसिंह चामुंडराय तुम्हीच आहांत. हें डळमळीत सिंहासन अढळ करण्याचें सर्वस्वी श्रेय आपल्यालाच आहे.

**चामुंडराय**—एकनिष्ठपणानें राज्यसेवा आणि धर्मसेवा करणें हेंच माझें कर्तव्य आहे. गंगराज्याविरुद्ध अन्याय वर्तन करणाऱ्या शत्रूला शासन देण्याला ही तलवार सदैव कोषमुक्तच आहे. महाराजांनीं माझा जो गौरव केला आहे. त्याबद्दल मी सदैव त्यांचा ऋणी आहे. प्रधानजी आपल्या आणि माताजींच्या शुभाशिर्वादानेंच माझी सेवा फलदायी होत आहे.

( इतक्यांत एक दूत येऊन नमस्कार करतो. )

**दूत**—महाराज...( खालीं मान घालून राहतो. )

**राजमल्ल**—काय हकीगत आहे ? कां बोलत कां नाहींस ?

**दूत**—महाराज...बंगेयूरच्या युद्धांत...

**चामुंडराय**—बोल, काय झालें, नागवर्माचा पराभव झाला ?

**दूत**—नाहीं, जिवांत जीव असपर्यंत त्यांनीं एक पाउलही मागें घेतलें नाहीं. पण अखेर मुडुराचय्यानें...

**राजमाता**—( घाबरून ) ह्मणजे ! नागवर्मा युद्धांत पडला ?

**प्रधानजी**—अरेरे.......

**चामुंडराय**—नागवर्म, नागवर्म, तुला वीरगति मिळाली. समरांगणीं लढत असतां मृत्यू येणें हें क्षत्रियांना भूषणच आहे. तूं आपलें कर्तव्य बजावलेस याबद्दल मला अभिमान वाटतो. मरेपर्यंत एक पाऊलही मागें हटला नाहींस येवढयानेंच तूं आपल्या कुलाला भूषणभूत झाला आहेस. हाय ! पण त्या घातक्यानें तुझा वध ... केला.

**राजमल्ल**—दंडनायक, नागवर्माच्या वियोगामुळें आपल्या इतकेंच आह्मां सर्वांनाही दुःख होत आहे. गंगराज्याच्या सेवाकार्यांत वीर नागवर्मानें आपलें नांव चिरस्मरणीय केलें आहे.

**चामुंडराय**—महाराज ज्यानें नागवर्माचा वध केला आहे त्या मुडुराचय्याचा पराभव केल्याशिवाय मला मुळींच समाधान होणार नाहीं. नागवर्माच्या मृत्यूनंतर हताश झालेल्या सैन्याकडे पाहून मुडुराचय्य तुच्छतेनें हंसत असेल. पण मुडुराचय्या, तुझा हा आनंद मेघांच्या आकृतिप्रमाणें क्षणकालच टिकणार आहे, हें ध्यानांत ठेव ! या चामुंडरायाच्या धनुष्याच्या टणत्काराबरोबर तुझें तें हास्य विलीन होऊन जाईल.—महाराज, माझें सैन्य अजूनही बाहेर तयार आहे. मुडुराचय्याला जिंकल्यानंतरच हा चामुंडराय पुन्हां आपल्या भेटीस येईल.

( जातो. ) पडदा पडतो.

---

## प्रवेश ५ वा—

[ स्थळ:—बगीचा, रक्कसगंग एका बाजूनें येतो. दुसऱ्या बाजूनें गोविंदमय्य एक पत्र घेऊन प्रवेश करतो. ]

**गोविंदमय्य**—महाराज, हें पत्र आतांच एका घोडेस्वारानें आणून दिलें आहे.

**रक्कसगंग**—(पत्र फोडून वाचतो व निराशेनें दीर्घ सुस्कार सोडतो.)

**गोविंदमय्य**—कोणाकडून आलें आहे. कांहीं अनिष्ट तर नाहीं ना! काय लिहिलें आहे त्यांत ?

**रक्कसगंग**—काय सांगूं गोविंदमय्य! हें पत्र प्रधानजींनीं पाठविलें आहे. मुडुराचय्यावर पाठविलेला चामुंडरायांचा भाऊ नागवर्म युद्धांत मारला गेल्याची दुःखद वार्ता यांत लिहिली आहे!

**गोविंदमय्य**—नागवर्म युद्धांत पडला ह्मणतां ? अरेरे! चामुंडरायासारखाच पराक्रमी होता. पण सध्यां चामुंडराय कोठें आहेत हें लिहिलें नाहीं कां त्यांत ?

**रक्कसगंग**—उच्छंगीचा किल्ला जिंकून ते नुकतेच राजधानीस परत गेले होते. तोंच ही अनिष्ट वार्ता कळतांच त्या मुडुराचय्याचें पारिपत्य-करण्यासाठीं ते बंगयूरकडे गेले आहेत. गोविंदमय्य, आमचें सैन्य घेऊन त्यांच्या मदतीला तुह्मांला पाठविण्याविषयीं प्रधानजींनीं लिहिलें आहे. जा, तुम्ही तावडतोब आमचें सर्व सैन्य घेऊन त्यांच्या मदतीला जा!

**गोविंदमय्य**—ठीक आहे. आजच जाण्याची तयारी करतो. मुडुराचय्यासारख्या मदमत्त सामंताचा नक्षा उतरविलाच पाहिजे. (जातो.)

**रक्कसगंग**—पण, प्रधानजींनीं ही दुसरी भानगड काय लिहिली आहे! मला तावडतोब तिकडे येऊन राजमल्लांना भेटावयास सांगितलें आहे. याचें कांहीं कारण कळत नाहीं. प्रधानजींनीं इतक्या तांतडीनें ज्या अर्थी

बोलावलें आहे त्या अर्थी तसेंच कांहींतरी महत्वाचें काम असलें पाहिजे. पण हा जयपाल कोण ? आणि त्याच्यासारख्या अनोळखी माणसाला राजमल्लनीं आपल्याजवळ जागा तरी कशी दिली ? ते आहेतच तसे एकमार्गी आणि भावनाप्रधान. पण प्रधानजींच्या संशयाप्रमाणें तो जयपाल जर फितुरी असेल तर याबाबतींत अधिक दक्षता घेतलीच पाहिजे. कदाचित् कोणी दुष्ट मनुष्य विश्वासानें त्यांचा घात करायलाही चुकणार नाहीं. तेव्हां प्रधान-जींच्या सल्ल्याप्रमाणें मला तिकडे जाऊन आलेंच पाहिजे ! (जातो.)

---

## प्रवेश ६ वा—

[ स्थळः—राजवाडा राजमल्ल व जयपाल बोलत बसले आहेत.]

**जयपाल**—महाराज, प्रधानजींची प्रकृती फारच खालावली असून त्यांना दरबारांत येणें अगदींच अशक्य झालें आहे. सध्यां ते अंथरुणावर अगदीं खिळूनच आहेत. सध्याच्या परिस्थितींत अशा अनुभवी मंत्र्याची अत्यंत जरूरी होती.

**राजमल्ल**—खरेंच, या प्रधानजींनीं आजपर्यंत मोठ्या इमानें इतबारें या गादीची सेवा केली आहे. वृद्धावस्थेमुळें सध्यां जरी राजकारणाकडे त्यांचें लक्ष नसलें तरी, ते होते ह्मणूनच गंगराज्याची घडी विस्कटली नाहीं. पण यापुढें त्यांचा सहवास फार दिवस लाभेल असें वाटत नाहीं. मनुष्याच्या या क्षणभंगुर जीवनांत असे प्रसंग हे यायचेच ! सुख-दुःख, संयोग-वियोग, जन्म-मरण, अशा अनेक द्वंद्वामुळेंच क्षणोक्षणीं प्रत्येक घटनेंत बदल होत असतो. मग त्यांचा सहवास तरी सदैव कसा लाभेल !

**जयपाल**—आपण ह्मणतां तेंच खरें आहे. प्रधानजींचा सहवास जरी अधिक काळ लाभणार नाहीं, तरी सध्याच्या राजकारणांतील वाढत्या

जबाबदारीमुळें व्यवस्थितपणें कारभार करणारा एकादा चतुर मंत्री आपल्याला नेमलाच पाहिजे.

**राजमल्ल**—होय, जयपाल मी तर त्याच विचारांत आहे. ही सर्व जबाबदारी नीटरीतीनें पार पाडील असा बुद्धिमान पुरुष कोण मिळेल हीच मला चिंता लागली आहे.

**जयपाल**—महाराज, आपली जर कृपा होईल, तर हा जयपाल अगदीं चाणाक्षपणानें सर्व जबाबदारी पार पाडण्यास तयार आहे. पण महाराजांचा माझ्यावर पूर्ण विश्वास पाहिजे.

**राजमल्ल**—काय, विश्वास ? अरे जयपाल तुझ्यावर माझा विश्वास नाहीं ? तूं इथें आल्यापासून तर तुझ्यावांचून एक क्षणही मला चैन पडत नाहीं. तुझ्यावर तर माझा पूर्ण विश्वास आहे. विसरलोंच मी, तुझ्यासारखा बुद्धिमान राजकारणी पुरुष माझ्याजवळ असल्यानंतर मला मुळींच चिंता करण्याचें कारण नाहीं, बस्स्, जयपाल वेळ येतांच तुलाच मंत्रीपद देऊन टाकतो. ( एक दूत येतो. )

**दूत**—महाराजांचा सदैव विजय असो. महाराज आपल्याला विजयाची आनंदवार्ता कळविण्यासाठींच मी आलो आहे. समरधुरंधर चामुंडरायांनीं मुदुराचय्याला ठार करून त्याच्या सर्व सैन्याची दाणादाण केली आहे. त्याचप्रमाणें त्याचा सर्व प्रदेश आपल्या ताब्यांत घेऊन चामुंडरायांनीं तेथें गंगनिशाण फडकविलें आहे.

**राजमल्ल**—शाबास, शाबास चामुंडराय, या पंचमकालांत आपण प्रतिनारायणच उत्पन्न झाला आहांत ! पाहिलेंस जयपाल, प्रतिज्ञा केल्याप्रमाणें चामुंडरायांनीं कसा विजय मिळविला तो !

**जयपाल**—होय महाराज, आपण ह्मणतां त्याप्रमाणें चामुंडराय मोठे वीरपुरुष आहेत यांत शंका नाहीं. अशा पराक्रमी सेनापतींचा आपल्याला लाभ झाला आहे, हें एक सुदैवच ह्मणायचें.

**राजमल्ल**—जा जयपाल ही आनंदवार्ता घेऊन येणाऱ्या या दूताला त्याच्या इच्छेनुसार बक्षीस दे, आणि ही आनंदवार्ता प्रधानजींना कळवून ये.

**जयपाल**—जशी आज्ञा, महाराज. ( दूतासह जातो. )

**राजमल्ल**—वीरवर चामुंडराय, तुह्मी आपल्या पराक्रमानें आणि धाडशी आक्रमणानें अनेक प्रबल शत्रूंचा निःपात करून गंगराज्याचें निशाण सर्वत्र फडकविलें आहे. तुमच्या कर्तबगारीनेंच हें सिंहासन स्थिर झालें असल्यामुळें हा राजमल्लच काय पण गंगवंशांतील यापुढील सर्व राजे तुमचे उपकार कधींही विसरणार नाहींत. ( रक्कसगंग येतो. )

**रक्कसगंग**—महाराजांना प्रणाम असो.

**राजमल्ल** - कोण, रक्कसगंग, आणि तूं आज अकस्मात इकडे कसा ?

**रक्कस**—बंगयूरच्या युद्धांत नागवर्म पडल्याची दुःखद वार्ता समजली आणि त्याबरोबरच चामुंडराय मुडुराचय्याचें पारिपत्य करण्यास गेले आहेत, हेंही कळलें. शिवाय प्रधानजी फारच आजारी असल्याचें वृत्तही कानीं आलें ह्मणून एकवार स्वतःच जाऊन यावें असा विचार करून आलो आहे.

**राजमल्ल**—रक्कस, आलास बरें झालें, चारदोन दिवसांत मीच तुला बोलावणार होतो. कारण सध्यां प्रधानजी फार आजारी असल्यामुळें त्यांच्या जागीं कोणाची तरी नेमणूक करणें अगदीं जरूर आहे. तेव्हां या बाबतींत तुह्मी सल्ला द्यावी ह्मणून—

**रक्कस०**—या बाबतींत माझी सल्ला घेण्यापेक्षां आपण अनुभवी प्रधान आणि कार्यकुशल सेनापति यांचीच सल्ला घेऊन त्याप्रमाणेंच सर्वकांहीं करणें अधिक उचित आहे. त्यांचें ह्मणणें काय आहे, या बाबतींत ?

**राजमल्ल**—हें पहा रक्कस, या बाबतींत मी प्रधानजींना कांहीं विचारलें नाहीं. पण चामुंडरायांचा सल्ला घेतां, ते ह्मणाले कीं—तुलाच प्रधानपद द्यावें.

**रक्कस०**—नको, नको, दादा ती जागा मोठ्या जबाबदारीची असल्यामुळें राजकार्यकुशल अशा अनुभवी माणसाचीच निवड होणें जरूर आहे.

**राजमल्ल**—अगदीं बरोबर बोललास तूं रक्कस; आणि तूं ह्मणतोस त्याचप्रमाणें मी एका हुषार, चाणाक्ष, कार्यकुशल अशाच मनुष्याची योजना करून ठेविली आहे.

**रक्कस०**—कोण, कोण ते दादा ? काय आहे त्यांचें नांव ?

**राजमल्ल**—रक्कस, तूं अलिकडे बऱ्याच दिवसांत इकडे आला नाहींस. त्यामुळें जयपालासंबंधीं तुला कांहींच माहीत असणें शक्य नाहीं. जयपाल अत्यंत दूरदर्शी आणि राजकारणांत तरबेज असल्यामुळें त्यालाच प्रधानपद द्यावें असा माझा निश्चय झाला आहे. बऱ्याच दिवसांपासून तो आमच्या सेवेस आहे.

**रक्कसगंग**—कोण, जयपाल ! नवीनच नांव ऐकतो आहे हें ? यापूर्वी तो कोठें होता, आणि काय करीत होता ?

**राजमल्ल**—कोठें होता, काय करीत होता, हे कांहीं मला माहीत नाहीं. पण मी अगदीं अनुभवानें सांगतो कीं, तो अगदीं लायक आहे या कामांत. त्याच्यासारख्या मुत्सद्याबद्दल नसती चौकशी करण्यांत काय अर्थ आहे?

**रक्कसगंग**—दादा, तुम्ही ह्मणतां त्याप्रमाणें तो मनुष्य चांगला असलही. पण ज्याचें नांव, गांव, पत्ता, धंदा आपल्याला कांहींच माहीत नाहीं, अशा एकाद्या नवख्या माणसावर प्रधानपद सोंपविणें ह्मणजे नौकेवरील सुकाणू कोणाच्याही हातीं देण्यासारखेंच नाहीं काय ? या बाबतींत आपण अधिक विचार करणें जरूर आहे. ज्यांनीं इमानें इतबारें या गादीची सेवा केली त्या वृद्ध प्रधानजींना विचारूनच आपण काय तें करावें. सध्यां जिकडे तिकडे फितुरी माजली असल्यामुळें आपण अगदीं सावधगिरीनेंच वागलें पाहिजे.

**राजमल्ल**—खरें आहे रक्कस, तूं ह्मणतोस त्याप्रमाणें सावधगिरी बाळगणें जरूर आहे. मात्र जयपाल तसा फितुरी नव्हे अं ! पूर्ण विश्वासू, अगदीं लाखांतला एक आहे.

**रक्कस०**—तें कांहीं असलें तरी या बाबतींत माताजी आणि प्रधानजी जो सल्ला देतील त्याप्रमाणें आपण वागावें, असें मला वाटतें.

**राजमल्ल**—ठीक आहे. तूं ह्मणतोस तर आतांच प्रधानजींना भेटून त्यांचा सल्ला घेऊन येऊं चल.

( जातात )

---

**प्रवेश ७ वा—**

[ बगीचा-जयपाल एकटाच प्रवेश करतो. ]

**जयपाल**—आतां मात्र या जयपालची मनीषा पूर्ण होणार। प्रत्यक्ष महाराजांचें आश्वासन मिळाल्यावर आतां हा जयपाल प्रधान कां होणार नाहीं ? परमेश्वरा, इतक्या दिवसांनीं कां होईना पण तूं माझी इच्छा पूर्ण केलीस ह्मणून तुला......हो, पण परमेश्वराला तरी इतकें महत्व काय ह्मणून द्यावयाचें ? जर त्याची कृपा असती तर यापूर्वीच मी प्रधान झालों असतो. खरें पाहिलें तर याचें सर्व श्रेय या जयपालच्या डोक्यालाच आहे. किती कारस्थानें केलीं, किती संकटांतून जावें लागलें, किती लोकांचा बळी द्यावा लागला. तेव्हां कोठें हें प्रधानपद हातीं लागत आहे. प्रधानकीचीं वस्त्रें मिळाली कीं, हा जयपाल सत्तेच्या जोरावर जें मनांत येईल तें करून दाखवील.

बस्स् आतां फक्त चार आठ दिवसांचा अवधी आहे. त्या वृद्ध प्रधानानें तर स्वर्गाकडे डोळे लावलेच आहेत. आणि नव्या राणीसरकारांचें मन वळवून भोळ्या राजमल्लला तर पूर्ण मुठींत आणलें आहे. आतां काय राहिलें ? झालास, जयपाला प्रधान तर झालास. ( जातो. )

---

प्रवेश ८ वा—

[ स्थळ—दिवाणखाना. चामुंडरायाची माता व कवि रन्न पुराणश्रवण करीत बसले आहेत. ]

**काललदेवी**—कविराज, तुह्मी सांगितलेलीं हीं वीरचरितें ऐकल्याबरोबर माझें अंतःकरण भरून येतें. अशा वीर पुरुषांच्या पराक्रमाचें वर्णन ऐकतांच कुमार नागवर्माची स्मृति होते, आणि या पुराणश्रवणानें मिळणारी सर्व शांतता नष्ट होऊन जाते.

**रन्न**—माताजी, आपण अशा कष्टी होऊं नका, क्षात्रियोचित कर्म करीत असतां नागवर्मानें धारातीर्थीं देह ठेवला. त्यानें आपलें नांव अजरामर केलें. अशाच वीरपुरुषांचीं चरित्रें सामान्य जनतेस आदर्शवत् होतात. आपण समंजस आहात. या क्षणभंगुर जीवनाची आपल्याला पूर्ण कल्पना आहे. मग वृथा शोक करण्यांत काय अर्थ आहे ?

**काललदेवी**—कविराज, तुमच्या नेहमींच्या उपदेशाप्रमाणें मी हें दुःख विसरण्याचा पुष्कळ प्रयत्न करतें. पण काय करूं, कुमाराची स्मृति होतांच या सर्व तत्वज्ञानाचा विसर पडतो.

**रन्न**—माताजी, या संसारी जीवनांत मोहासारखा दुसरा प्रबल शत्रू नाहीं. ह्मणून तर पुराणश्रवण, पूजाअर्चा, मुनिसेवा व धर्मचिंतन वगैरे गोष्टींत मन गुंतवून या मोहावर विजय मिळवायचा असतो. आपल्याला समरधुरंधर चामुंडरायासारखें रत्न सुदैवानें लाभलें असतां खेद करण्याचें कोणतें कारण आहे ?

**काललदेवी**—कविराज, आतां मला कोणत्याच गोष्टीची आशा नाहीं. माझ्या वीरपुत्रांनीं मला धन्यता मिळवून दिली आहे. आतां माझी फक्त एकच इच्छा आहे. नेमिचंद्राचार्यांनीं परवाच ज्या बाहुबलीच्या प्रतिमेचें वर्णन केलें, त्या अद्वितीय मूर्तीचें दर्शन घडावें ह्मणजे माझ्या जीवनाचें पूर्ण सार्थक झालें. यापेक्षां माझी कोणतीही अपेक्षा नाहीं.

**रत्न**—पण माताजी, आपण बाहुबलीच्या ज्या प्रचंड मूर्तीचें वर्णन ऐकलें आहे ती पोदनापूरच्या जंगलांत लतावेलींनीं आणि वारुळांनीं अदृश्य झाली आहे. त्यामुळें तिचें दर्शन होणें अशक्य आहे. फार प्राचीन काळापासून तिकडे कोणीही गेलें नसल्यामुळें सध्यां तें स्थळ कोठें आहे याचाही तपास लागणार नाहीं.

**काललदेवी**—कविराज, हे तुमचे निराशेचे उद्गार मला बिलकूल निरुत्साही करूं शकत नाहींत. चामुंडरायासारखा वीरपुत्र माझ्या पोटीं जन्माला आला असतां मी काय म्हणून निराश व्हावें, ज्यानें अनेक शत्रूंचा निःपात करून इतके देश जिंकले त्याच्या हातून या मूर्तीचा शोध लागणार नाहीं काय ? मग त्याचें वीरत्व काय कामाचें ? कविराज, माझी ही इच्छा जोंपर्यंत पूर्ण झाली नाहीं तोंपर्यंत मी दुग्धाहाराचा त्याग करीत आहे. माझी ही अंतिम आशा चांमुंडरायाच्या हातून पूर्ण होईल तरच मी सुखानें प्राण सोडीन.

**रत्न**—पण माताजी...तुमची ही प्रतिज्ञा... [ पडदा पडतो ]

---

## प्रवेश ९ वा—

[ स्थळ–बगीचा–जयपाल निराशेनें प्रवेश करतो. ]

**जयपाल**—आशानिराशेच्या आंदोलनांतच माझें जीवन व्यथित व्हावें असाच विधिसंकेत आहे काय ? कालचा हा समारंभ झाल्यापासून आणि तो प्रत्यक्ष माझ्या डोळ्यासमक्ष घडल्यापासून माझ्या अंतःकरणांत कोणीतरी तप्त लोखंडानें डागण्या दिल्याप्रमाणें वेदना होत आहेत. थेरड्या ! शेवटीं मरतां मरतां माझा सर्वस्वी घात केलास. चामुंडरायालाच प्रधानपद द्यायला लावून माझ्या आशा-आकांक्षांची होळी केलीस.

इतकीं कारस्थानें केलीं, राजेसाहेबांना पूर्ण विश्वास पटवून त्यांचेही आश्वासन घेतलें. पण त्या रक्मगंगानेंच हा घोंटाळा करून सोडला. त्यानेंच प्रधानाकडून महाराजांचें मन वळविलें आणि माझ्या तोंडांतला घास काढून त्या सेनापतीलाच प्रधानपदही दिलें. पण अशा हुंडलहप्पी शिपायांनीं रण-भूमीवर जरी मर्दुमकी गाजविली तरी प्रधानाचें कार्य माझ्यासारख्या विद्वाना-कडेच असलें पाहिजे. ही साधी गोष्टही त्या रक्मसाला त्या राक्षसाला कळूं नये?... ठीक आहे, तुला आणि तुझ्या त्या आवडत्या चामुंडरायाला नष्ट केल्यावांचून माझें आसन स्थिर होणार नाहीं हें मी जाणतो आहे, आणि हें कार्य माझ्या-सारख्या कारस्थानी वीराला मुळींच अशक्य नाहीं. "चामुंडरायाच्या मदतीनें भावाला दूर करून तूं ही गादी मिळवूं इच्छितोस!" एवढा एकच विषारी विचार राजमल्लच्या मनांत कालविला कीं झालें काम! तुला आणि त्या चामुंडरायाला विश्वासघातकी, राज्यद्रोही ठरवून अंधारकोठडींत खेचण्याला आणखी कोणतें कारण हवें आहे? वेड्यांनो या काळसर्पाच्या डोक्यावर पाय देऊन तुम्ही सुखानें कसे जगूं शकणार? अग्नीच्या एकाच ठिणगीनें किंवा विषाच्या एकाच थेंबानें जें कार्य होतें, तेंच या जयपालाच्या एका शब्दानें होणार आहे. तुमच्या या कृत्याचा सूड उगवायला आलेली ही संधी कोण वाया दवडील? प्रधानपद मिळविण्यासाठीं हा जयपाल तुह्मांला देहांत शासन देण्यालाही कमी करणार नाहीं.

( जयपाल एका बाजूनें जातो व दुसऱ्या बाजुन भीमय्य प्रवेश करतो. )

**भीमय्य**—आतां या जयपालाची कुठें गांठ पडते कोण जाणें. बाकी आह्मां निशाचरांना अशा लोकांची दिवसा भेट होणें अशक्यच आहे ह्मणा. बाहेर दिसायला मोठा सभ्यासीत पण कृत्यें मात्र बेरडालाही लाजविणारीं. अशी ही जयपालाची स्वारी. प्रधानपद मिळविण्यासाठीं आजपर्यंत त्यानें किती दुष्कृत्यें केलीं आहेत याची यादी ब्रह्मदेवालाही सांपडायची नाहीं. येथें आल्यापासून तर त्यानें राजमल्लला अगदीं मुठींत घेतलें आहे आणि चामुंड-

रायाविषयीं नाहीं तीं कारस्थानें रचून नव्या राणीसाहेबांचें मनही कलुषित केलें आहे. ... पण यानें मला आज कां बोलावणें केलें असावें बरें ! आणखी काय कारस्थान करणार आहे कोण जाणे ! बाकी हा प्रधान झाला ह्मणजे मी मात्र सरदार झालोच ह्मणून समजावें. माझ्यावांचून जयपालाचें एक क्षणभरही चालणार नाहीं. कारण त्याचा मार्ग निष्कंटक करण्याचें कार्य या भीमय्यावांचून कोण करणार आहे ! हो पण इथें राहाण्यापेक्षां त्याचा तपास केलेलाच बरा ! (जातो.)

---

## प्रवेश १० वा.—

[ स्थळ—राजवाडा-राजमल्ल हताश होऊन विचार करीत आहे. ]

**राजमल्ल**—सत्ता आणि वैभव मिळविण्यासाठीं मनुष्य केव्हां काय करील याचा ब्रह्मदेवालासुद्धां पत्ता लागायचा नाहीं. प्रत्यक्ष पाठचा भाऊच जर माझ्यावर उलटला आहे, तर त्या चामुंडरायाला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ? अरेरे, माझ्या स्वप्नांत देखील ही कल्पना नव्हती कीं, चामुंडराय राज्यपद मिळविण्याची इच्छा करील ह्मणून ! अनेक कष्ट सहन करून पोषविलेल्या आपल्याच बालकाचा मातेकडून घात होईल काय ? कोणी सांगावें नाहीं ह्मणून ! चामुंडराय आणि रक्कसगंग यांचीं हीं कारस्थानें ऐकून मी तर भ्रमिष्टच झालों आहे. आतां काय करावें हेंच कळत नाहीं. यावेळीं जयपालासारखा चाणाक्ष मनुष्य जर जवळ नसता तर या दुष्टांनीं माझा वध करायलाही कमी केलें नसतें. तो येथें असूनही चामुंडरायालाच प्रधानपद देण्याबद्दल रक्कसगंगाचा आग्रह कां होता हें आज मला कळून चुकलें...... पण हें खरें असेल कां ? तासन् तास असा विचार करीत बसतो, पण माझा या गोष्टीवर विश्वासच बसत नाहीं. पण खोटें सांगण्याचें जयपालास तरी

काय कारण आहे ! शिवाय राणीलासुद्धां असाच संशय आला होता. पण फाजील विश्वास ठेवून मी मात्र गाफील राहिलो होतो.

( जयपाल-एकदम प्रवेश करून )

**जयपाल**—आणि यापुढेंही असेंच गाफील राहाणार आहांत ? प्रत्येक क्षणाला त्यांचें एकेक कारस्थान उघडकीला येत असतां आपण अजूनही विचारांतच वेळ घालवीत आहात. प्रत्यक्ष राणीसाहेबांनीं सांगितल्या-नंतरही आपली खात्री पटूं नये, ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

**राजमल्ल**—जयपाल, कांहींही म्हण, मला वाटेल तो दोष दे, नादान म्हण, निर्बल म्हण, पण यावेळीं काय करावें हेंच मला कळेनासें झालें आहे.

**जयपाल**—मी तरी तेंच म्हणतो. प्रत्यक्ष जिवावर येऊन बेतलें आहे, मग काय करावें हें कसें कळणार ? महाराज, एकामागून एक राज्यें जिंकून चामुंडरायानें सर्वत्र आपला दरारा बसविला आहे. आपण तर त्याला मोठ-मोठ्या पदव्या देऊन आणि पदोपदीं त्याचा गौरव करून त्याला डोक्यावर चढवून घेतलें आहे. जिकडे तिकडे त्याच्याच नांवाचा जयजयकार होत आहे. आणि अशावेळीं प्रत्यक्ष आपला भाऊ त्यालाच सामील झाला असतां काय करावें हें तुम्हांला कळत नाहीं ? म्हणजे अजूनही आपला त्यांच्यावरच विश्वास आहे तर ! मग जें खरें होतें तें सांगून मीच मूर्खपणा केला. असेंच ना ?

**राजमल्ल**—नको, नको, जयपाल मला अधिकच बुचकळ्यांत टाकूं नको. मी तुला यत्किंचितही दोष देत नाहीं.

**जयपाल**—महाराज, आपल्यावरील निस्सीम प्रेमामुळें मला जें जें सांगावेंसें वाटलें तें मी सांगितलें आहे. आतां मला येथून निघून जाण्यास परवानगी द्यावी. हीच एक माझी विनंति आहे.

**राजमल्ल**—जयपाल, जयपाल, अशा बिकट प्रसंगीं तूंही निघून जातोस ! नको, जयपाल माझ्या निर्मल हृदयावर तूंही असा प्रहार करूं नको.

**जयपाल**—मग काय करूं ? घडधडीत डोळ्यांनीं पहात असूनही या पेटलेल्या राजवाड्यांत राहून माझाही सत्यानाश करून घेऊं ? नको, महाराज मला तीर्थयात्रा करून आत्मकल्याण करून घेण्यासाठीं तरी येथून जाण्याची परवानगी द्या.

**राजमल्ल**—जयपाल, तूं असा भिऊं नको. आतांपर्यंत माझा या गोष्टीवर विश्वासच बसत नव्हता. पण तुझ्या या तळमळीच्या उद्गारामुळें माझ्या डोळ्यांत चांगलेंच अंजन घातलें आहे. सांग, तूंच सांग या नीच घरभेद्यांना काय शासन करूं हें तूंच सांग ?

**जयपाल**—महाराज, एक तर त्यांत आपले पाठचे भाऊ आहेत. आणि दुसरे गंगराजरक्षक सेनापती चामुंडराय ! अशा परिस्थितींत लहान तोंडी मोठा घास घेऊन मी तरी काय सांगूं ? आपण बुद्धिमान् आहात, विचारी आहात, आपणच त्यांचा योग्य बंदोबस्त करावा. महाराज, आपल्या जिवास धोका नसला म्हणजे त्यांतच मला आनंद आहे.

**राजमल्ल**—ठीक आहे. आतां या क्षणींच या प्रकरणाचा निकाल लावतो. सेनापती असो किंवा भाऊ असो. या राजकारणांत कोणाचाच विश्वास धरून चालणार नाहीं. जा, जयपाल आतां याक्षणीं रक्कसगंग आणि चामुंडराय यांना माझ्या सहीशिक्याचीं पत्रें पाठवून इकडे बोलावून घे. बस्स त्यांना कैद केल्याशिवाय माझ्या मनाला बिलकूल स्वस्थता लाभणार नाहीं.

(पडदा पडतो.)

= अंक २ रा समाप्त. =

# अंक ३ रा.

**प्रवेश १ ला--**

[ स्थळ-राजवाडा—राजमल्ल एकटाच विचार करीत बसला आहे. ]

**राजमल्ल**—मी करतो आहे हें चुकत तर नाहीं ना ? कां कोण जाणें, पण माझें मन अधिकाधिक बुचकळयांत पडत आहे. चामुंडराय आणि रक्कसगंग यांना कैद करण्याचा निश्चय तर केला आहे. पण तो निश्चय अंमलांत आणण्याचें धैर्यच होत नाहीं. काय करूं ? (जयपाल येतो).

**जयपाल**—आपल्या तांतडीच्या हुकमाप्रमाणें चामुंडराय आपल्या भेटीस येत आहेत.

**राजमल्ल**—कोण ? चामुंडराय येत आहेत ? आणि बरोबर त्यांनीं आपलें सैन्यही आणलें आहे ?

**जयपाल**—नाहीं. महाराजांना तसें मुळींच घाबरण्याचें कारण नाहीं. सध्यां ज्या किल्ल्याला वेढा घातला आहे, तो वेढा न उठवितां फक्त एकट्या चामुंडरायालाच इकडे येऊन जाण्याबद्दल मी लिहिलें होतें.

**राजमल्ल**—शाबास, जयपाल आहेसच तूं तसा चाणाक्ष. जा, चामुंडरायांना इकडे तावडतोब पाठवून दे. आणि हें पहा तसा प्रसंगच आला तर ठरल्याप्रमाणें तूं देखील अगदीं तयारींत रहा.

**जयपाल**—त्याची बिलकूल काळजी नको. मी सर्व तयारी पूर्वींच करून ठेविली आहे. ( जातो. )

**राजमल्ल**—आतां चामुंडरायाला काय विचारायचें हेंच कळत नाहीं. त्याला एकदम इकडे परत बोलावण्याचें कारण तरी काय सांगूं ? कीं एकदम कैद करण्याचाच हुकूम देऊं ? काय करावें हेंच सुचेनासें झालें आहे. चामुंडरायाचें नांव उच्चारतांच आजपर्यंतचा सर्व इतिहास डोळ्यापुढें उभा राहातो. आणि पाण्यांत टाकलेल्या ढेंकळाप्रमाणें माझा सर्व निश्चय एका

क्षणांत पार नष्ट होऊन जातो......नको असले दुबळे विचार मनांतून काढूनच टाकले पाहिजेत. या राजकारणांत नसता भ्याडपणा काय कामाचा ? निश्चय तो निश्चय ! बस्स् चामुंडराय येतांच त्याला कैद करणें ! हाच एक निर्धार ! (चामुंडराय येतो.)

**चामुंडराय**—महाराजांना वंदन असो. सर्व कांहीं कुशल आहे ना ? तिकडे घनघोर युद्ध चाललें असतां मला इतक्या तांतडीनें परत कां बोलाविलें असावें याचा कांहींच अंदाज करतां येईना. परंतु तसेंच कांहींतरी महत्वाचें कार्य असल्यावांचून महाराजांची आज्ञा होणार नाहीं, ह्मणून तावडतोब निघून आलों आहे.

**राजमल्ल**—.........चामुंडराय.........

**चामुंडराय**—महाराज आज आपण असे स्तब्ध कां ? आपला चेहराही अगदीं मलीन दिसत आहे. आपल्याला कशाची चिंता लागली आहे ? बोला, असे स्तब्ध कां ? महाराज, आपल्या इच्छेकरितां स्वतःचे प्राणही पणाला लावणारा हा चामुंडराय इथें उभा असतांना आपण असे कष्टी कां होता ?

**राजमल्ल**—चामुंडराय......चामुंडराय, नाहीं, मला तुमच्यापुढें बोलण्याचें धैर्यच होत नाहीं. पण...

**चामुंडराय**—महाराज आपण काय ह्मणतां आहात, तें कळूं दे तरी; मजकडून कांहीं अपराध तर घडला नाहीं ना ? मनांत जें असेल तें स्पष्टपणें बोला.

**राजमल्ल**—दंडनायक, तुह्मी आजपर्यंत या गंगराज्याची सेवा केली आहे, हें मी जाणतो. तुमच्याच पराक्रमानें या राज्याची विस्कटलेली घडी नीट बसली आणि पुष्कळ राज्यविस्तारही झाला. ह्मणूनच गंगराज्याचें भूषण असलेली ही तरवार तुमच्या हातीं देऊन मी तुमचा गौरव केला. पण...पण, चामुंडराय तुह्मीच सध्यां काय कारस्थानें करीत आहात याचा विचार करा.

ज्या तरवारीनें तुह्मी गंगराज्याचें वैभव वाढविलें त्याच तरवारीच्या जोरावर मला पदच्युत करून हें राज्यवैभव मिळविण्याचा तुह्माला मोह होत आहे, खरें ना ? चामुंडराय, खरें आहे ना हें ?

**चामुंडराय**—महाराज, महाराज, काय ऐकतो आहे मी हें ! असले हे उद्गार तुमच्याच तोंडून ऐकण्याचें दुर्भाग्य लाभावें, हेंच काय माझ्या निःस्सीम सेवेचें फळ ? महाराज हें विष आपल्या कानांत कोणी ओतलें ? महाराज, ज्या चामुंडरायानें स्वतःच्या प्राणाची पर्वा न करतां अनेक शत्रूंशीं सामना केला; गंगराज्य धुळीस मिळविण्याचा कट करून बसलेल्या अनेक कारस्थानी लोकांना यमसदनास पाठविलें; प्रत्यक्ष आपल्या भावाचा बळी देऊन मुडुराचय्यासारख्या शत्रूचा निःपात केला; आणि शेंकडों संकटांशीं झुंजून तुमचें जीवन सुखमय बनविलें; त्या सर्व कर्तव्यनिष्ठेबद्दल अखेर हेंच फळ मिळालें काय ? चामुंडराय, धिःकार धिःकार असो तुझ्या जीवनाला. पण महाराज, यांत आपला तरी काय दोष आहे ? दुर्दैव माझेंच, ह्मणूनच आपल्याला हे विचार सुचले. या राजकारणांतून मुक्त करून मला आत्म कल्याण प्रवृत्त करीत आहात. याबद्दल आपले उपकारच मानले पाहिजेत. जाऊं दे तें, महाराज, मोठ्या विश्वासानें जी तलवार आपण माझ्या स्वाधीन केली, ती ही तलवार मी आपल्याला परत देत आहे. या चामुंडरायानें मनांत आणलें असतें तर तो कधींच राजा होऊन बसला असता. पण असले क्षुद्र विचार आजपर्यंत चुकूनही माझ्या मनाला शिवले नाहींत, पण वाईट वाटतें तें इतकेंच कीं, आपल्या तोंडून असला हा आरोप ऐकण्यापूर्वींच जर एखाद्या युद्धांत माझा प्राण गेला असता, तर मी धन्यता पावलों असतो. तें सुख फक्त नागवर्माला मात्र लाभलें. क्षमा करा, महाराज यापुढें एक क्षणही येथें राहाण्याची माझी इच्छा नाहीं. ( निघून जातो. )

**राजमल्ल**—चामुंडराय, चामुंडराय ............

( बेशुद्ध होऊन धाडकन् खालीं पडतो व जयपाल धाऊन येतो. )

**जयपाल**—महाराज, हें काय ? महाराज.....

( पडदा पडतो )

---

**प्रवेश २ रा—**

[ स्थळ—रस्ता, रक्कसगंग एकटाच प्रवेश करतो. ]

**रक्कसगंग**—इतक्या तांतडीनें दादांनीं मला कां बोलाविलें आहे कोण जाणे ? कांहीं अशुभ तर नसेल ना ? तेथून निघाल्यापासून एकसारखीं दुश्चिन्हें होत आहेत. आणि येथेंहि सारें नगर उदास—मृतवत् दिसत आहे. कोणाच्या तोंडावर हास्य नाहीं, कोणी कांहीं बोलत नाहीं, हा प्रकार तरी काय आहे ? अनेक शंकाकुशंकांनीं मन भांबावून गेलें आहे. पण आतां येथें येऊन अधिक विचार तरी कशाला ? येथून राजवाडा कांहीं दूर नाहीं. (जातो)

---

**प्रवेश ३ रा—**

[ स्थळ—राजवाडा—जयपाल राजमल्लास वारा घालीत आहे. राजमाता जवळ बसली आहे. ]

**राजमाता**—पण एकाएकीं असें बेशुद्ध होण्यासारखें झालें तरी काय?

**राजमल्ल**—काय होणार ! ज्यांच्या आधारावर माझें वैभव वृद्धिंगत झालें, ज्यांनीं माझें राज्य स्थिर केलें, तेच जर माझ्याविरुद्ध कारस्थानें करूं लागले, तर माझ्या मनाला स्वस्थता तरी कशी लाभणार ? आई काय सांगूं आतां, वरून आकाशच कोसळलें आणि पायाखालची धरणी डळमळूं लागली तर मानवप्राण्यांची जी अवस्था होईल तीच अवस्था माझी झाली आहे.

**राजमाता**—राजमल्ल, तुह्मां सर्वांना हें काय वेड लागलें आहे कोण जाणें. नसता संशय घेऊन तुह्मी किती अनर्थ करणार आहांत हेंच कळत नाहीं. राजमल्ल, तुह्मी राजाराणीच जर असे संशयी बनला, तर एका क्षणांत जिकडे तिकडे यांचा डांगोरा होईल, आणि शत्रूंचे आयतेंच फावेल. कां आपल्याच हातानें पायावर दगड पाडून घेतां आहांत !

**जयपाल**—माताजी आपल्याला अद्याप याची पूर्ण कल्पना नाहीं. आतांच चामुंडरायांनीं जें उद्धट वर्तन केलें, त्याचाच परिणाम होऊन महाराज असे बेशुद्ध पडले.

**राजमाता**—काय ह्मणतां, चामुंडराय येथें आले होते ? आणि कुठें आहेत ते ? कुठें आहेत चामुंडराय ?

**राजमल्ल**—चामुंडराय---( दीर्घ सुस्कारे सोडतो )

**राजमाता**—जयपाल कुठं गेलं चामुंडराय ?

**जयपाल**—ही पहा, महाराजांनीं गंगराज्य रक्षणासाठीं त्यांच्या हातीं दिलेली ही तलवार महाराजांच्यापुढें टाकून एका क्षणापूर्वीच ते निघून गेले.

**राजमाता**—ह्मणजे, त्यांनीं सेनापतिपदाचा त्याग केला ? राजमल्ल, तूं त्यांच्यावर निरर्थक कांहींतरी आरोप केल्यावाचून त्या चामुंडरायांच्या हातून असें केव्हांच घडणार नाहीं. राजमल्ल काय केलेस हें ? जग तुला काय ह्मणेल ? किती किती तूं कृतघ्न झालास ? चामुंडराय, चामुंडराय, कुठें गेलां तुह्मी ?...जा, जा जयपाल, ते असतील तेथून त्यांना बोलावून आण... काय ? तूंही जात नाहींस, नाहीं ना जात ? राहूं दे मी स्वतः जातें, त्यांची क्षमा मागते, दुष्टांनो, काय केलें हें तुह्मी ? ( जाते ).

**राजमल्ल**—जयपाल, या प्रसंगीं काय करावें हेंच मला कळत नाहीं. माझ्या मनाचा कांहींच निर्धार होत नाहीं, काय करूं ?

**जयपाल**—हें असें होणार याची मला कल्पना होतीच. ह्मणूनच मी आपल्याला बजावून सांगत होतो. महाराज, शिकार आयती घरीं चालून आली असतां हातची सोडून बसला. आतां तो चिडलेला नाग आपल्याला केव्हां दंश करील हें मुळींच सांगतां येणार नाहीं.

**राजमल्ल**—पण जयपाल, त्याच्या वर्तनावरून मला तरी तसें मुळींच वाटत नाहीं. तसें असले तर त्यांनीं ही तलवार परत करून अधिकारपदाचा मुळींच त्याग केला नसता.

**जयपाल**—महाराज आपण फारच भोळे आहात. हें केवळ कारस्थानी लोकांचें नाटक आहे. असें केल्यावांचून त्यांचीं कारस्थानें पचणार कशी ? तुमच्याकडून मिळणाऱ्या अधिकारपदाची त्यांना काय जरूरी आहे ? हातांखालीं भरपूर सैन्य आणि लोकांत असा दरारा असल्यानंतर तुमच्या आधीन राहणें त्यांना आवडेल काय ? आज ना उद्यां हा प्रसंग येणारच होता. मग त्याबद्दल इतका खेद करण्याचें तरी काय कारण आहे ? इतकी नामी संधी मिळाली असतां तिचा आपल्याला उपयोग करून घेतां आला नाहीं याचेंच मला मोठें वाईट वाटतें.

**राजमल्ल**—जयपाल, तूं मला वाटेल तो दोष दे, पण...पण या बिकट परिस्थितींतून मला तारून ने. माझा सर्व भरंवसा तुझ्यावरच आहे. आतां प्रधानही तूंच आहेस, आणि सेनापती पण तूंच !

( रक्कसगंग येतो. )

**रक्कसगंग**—हाच तो सेनापती काय ? याच्याच सल्याप्रमाणें तुह्मी कारभार चालविला आहे ? दादा, खरोखरच तुह्मी चामुंडरायांना दूर केलें काय ? आतांच जी अनिष्ट वार्ता कानीं पडली, ती दुर्दैवानें खरी ठरली तर ? अरेरे, दादा, तुह्मी किती अविचार केला हा ! धिःकार धिःकार असो तुमच्या या कृतघ्नतेचा ! दादा, तुह्माला आपल्या पूर्वेतिहासाचा इतक्या लवकर विसर पडला तर ? पिताजींच्या मृत्यूनंतर चोहोंकडून उठलेल्या बंडखोरांच्या वादळांतून हें गंगसिंहासन बचावण्याचा कोणी प्रयत्न केला ? आमच्या प्राणावरील संकट कोणी दूर केलें ? प्रत्यक्ष पाठच्या भावाचा बळी देऊन मोठमोठ्या शत्रूंचा नायनाट कोणी केला ? गंगराज्याचें वैभव वाढविण्याला कोणाचा पराक्रम कारणीभूत झाला ? या सर्व कारणांचा आपण कधीं विचार केला आहे काय ? पूर्णपणें संकटमुक्त होतांच तुह्माला ही सद्बुद्धी सुचली काय ? दादा, तुह्मी त्या नरवीराला कोणत्या तोंडानें दोष देतां ? चामुंडरायांना जर राज्याची हाव असती, तर अज्ञातवासांत काळ कंठणाऱ्या

दुर्बल राजमल्लला त्यानें राज्यतिलक केला असता काय? त्याचवेळीं त्यानें राजा होण्याचें मनांत आणलें असतें तर त्याच्याविरुद्ध एक शब्द उच्चारण्याची तरी कोणाची छाती होती? पण त्या महात्म्याच्या अंतःकरणांत इतकी कुटिलता भरलेली नाहीं. शौर्य, साहस, धर्म, नीति, कर्तव्यतत्परता आणि उदारता इत्यादि अनेक सद्गुणांनीं जे सर्व जनतेला पूज्य झाले आहेत, त्यांच्यावर हा निंद्य आरोप करतांना तुह्माला कांहींच कसें वाटलें नाहीं! दादा, तुह्मी एका विश्वासघातकी, राष्ट्रद्रोही आणि फितुरी माणसाच्या शब्दावर विश्वास ठेवून किती किती हा कृतघ्नपणा केला!

**राजमल्ल**—जीभ सांभाळून बोल. रक्कसगंग, तूं कोणापुढें हे शब्द उच्चारतो आहेस याची तुला जाणीव आहे? राष्ट्रद्रोही आणि फितुरी दुसरे कोणी नसून स्वतः तूंच आहेस! चामुंडरायाच्या मदतीनें राज्य मिळविण्याच्या दुष्ट हेतूनें तूं फितुरी बनला आहेस; आणि पुन्हां दुसऱ्यावर हा आरोप करतोस?

**रक्कस०**—चामुंडराबारोबर मीही फितुरी बनलो आहे? दादा, या हरामखोरानें इतकी कारस्थानें केलीं आहेत तर! ठीक आहे. दादा आपल्या संशयाला कारणीभूत होऊन येथें राहण्यापेक्षां या क्षणीं मी आपल्या राज्याचा त्याग करून तुह्मांला निश्चिंत करतो. (जाऊं लागतो.)

**राजमल्ल**—रक्कस, चाललास कुठें? तुझ्यासारख्या फितुरी आणि विश्वासघातकी लोकांना मोकळे सोडण्याइतका हा राजमल्ल वेडा नाहीं. जयपाल, कैद कर त्याला. (जयपाल पुढें जाऊं लागतो. रक्कसगंग तलवार उपसतो.)

**रक्कस०**—कैद करण्यापूर्वी या रक्कसगंगाच्या तरवारीला दोघांनाही बळी पडावें लागेल. चल ये पुढें हरामखोरा......नको,...नको हा अविचार, रागाच्या भरांत बेभान झाल्यामुळें मला माझ्या कर्तव्याचा विसर पडला. धिःकार असो या राज्यवैभवाला. दादा, ही घ्या आपली तरवार, (तरवार फेकून देतो) हा मी आपला कैदी आहे! (पडदा पडतो.)

---

**प्रवेश ३ रा—**

( स्थळ—जंगल—एका बुरखेवाल्याचा प्रवेश. )

**बुरखेवाला**—बस्स्, पुरे झाला आतां हा बदमाषपणा, या दुष्ट जयपालाच्या नादीं लागून आजपर्यंत-जीं दुष्कृत्यें केलीं त्याची स्मृति होतांच माझ्या पाषाणासारख्या हृदयाला देखील पाझर फुटला आहे. नसत्या आशेला बळी पडून त्या जयपालाच्या सांगण्यावरून शेंकडों कारस्थानें केलीं, आणि त्या सर्व पातकावर कळस चढविण्याकरितांच कीं काय, पण चामुंडरायाचा वध करण्यासही तयार झालो. पण त्या महात्म्याचें तें दैवी तेज, त्याची ती निष्पाप बाणेदार मुद्रा, ती भव्य देहयष्टी आणि अलौकिक शांतता पाहातांच माझ्या अंतःकरणांत कां कोण जाणें दयेचा पाझर फुटला. हातांतील शस्त्र आपोआप गळून खालीं पडलें; आणि आजपर्यंत केलेल्या शेंकडों दुष्कृत्यांबद्दल पश्चात्ताप झाला. मला वाटतें त्या महात्म्याच्या रक्षणासाठीं अदृश्य देवता वास करीत असाव्यात, ह्मणूनच माझ्यासारख्या निर्दयी मनुष्याच्या हृदयांत देखील दयेचा अंकूर उगवला. ( बुरखा पांघरून जयपाल येतो. )

**जयपाल**—कोण, भीमय्य, ठरल्याप्रमाणें इथें परत आला आहेस तर ? झालें ना काम फत्ते ? मित्रा, आतां तूंच या गंगराज्याचा सेनापती होणार आहेस. कां बोलत कां नाहींस ? भीमय्य......

**भीमय्य**—जयपाल, पुरे झाली तुझी ती प्रधानकी आणि त्या सेनापती पदाचाही तुलाच लखलाभ असो. वेड्या आशेला बळी पडून तुझ्या सांगण्याप्रमाणें शेंकडों दुष्कृत्यें केली; आणि रौरव नरकाचा मात्र धनी झालों. चामुंडरायाचा वध करण्यासही मी तयारी दाखविली. पण त्या अलौकिक तेजस्वी वीरपुरुषाचें दर्शन घडतांच माझ्या अंतःकरणांत पालट झाला. आणि त्याच क्षणीं मी अशी प्रतिज्ञा केली कीं, यापुढें असलें निंद्य कृत्य कधींही करायचें नाहीं. जयपाल, मला तुझें तें सेनापतीपद मुळींच नको आहे. ठरल्याप्रमाणें तुझ्याकडे येणें असलेल्या पांचशें मोहरा देऊन टाक. मी कोठेंतरी राहून सुखानें पोट भरीन. पुरे हा अज्ञातवास !

**जयपाल**—भीमय्य, हें पापपुण्याचें वेड कुठून शिरलें तुझ्या हृदयांत. जा, ठरल्याप्रमाणें हें कृत्य करून ये. चामुंडरायाचा वध केल्यावांचून तुला एक दमडीही मिळणार नाहीं. ह्मणे पांचशे मोहरा पाहिजेत.

**भीमय्य**—जयपाल, तुझी ही फसवेगिरी माझ्यापुढें चालणार नाहीं. आजपर्यंत जिवावर उदार होऊन अनेक कामें केलीं. प्रत्येक वेळीं तुझे वायदे ऐकिले, पण आज या घटकेला पांचशे मोहरा घेतल्यावांचून तुला येथून हालूं देणार नाहीं. या भीमय्याशीं संबंध आहे. ध्यानांत ठेव !

**जयपाल**—हरामखोरा, अखेर माझ्याशीं दगाबाजी करतोस ? दुसरीकडून भरपूर लांच मिळाल्यावांचून तुझ्यासारख्या बेरडाच्या अंतःकरणांत मुळींच पालट होणार नाहीं. ठीक आहे. माझ्याशीं प्रसंग आहे हें विसरूं नको ! ( जाऊं लागतो )

**भीमय्य**—अरे वा ! पुन्हां माझ्यावरच लांच खाल्ल्याचा आरोप लादतोस काय ? पण चाललास कुठें ? हा भीमय्य आतां शेवटचा तुझाच बळी घेऊन सर्व दुष्कृत्यांची समाप्ती करणार आहे. नीचा, हरामखोरा, जातोस कुठें ? ( कट्यार उपसून त्याच्या अंगावर धावून जातो. जयपाल तरवार उपसतो. पण भीमय्य त्याला खालीं पाडून त्याच्या उरावर बसून कट्यार खुपसूं लागतो. )

**भीमय्य**—अखेर माझ्यावरही तरवार उपसून आलास काय ? तुला याच क्षणीं यमसदनीं पाठविलें असतें, पण नको, या घातकी कृत्यापासून परावृत्त झालेला हा भीमय्य तुला जीवदान देत आहे. मात्र तुला जिवंत ठेवून तुझ्या दुष्कृत्याचें पुरेपूर प्रायश्चित्त दिल्यावांचून या भीमय्याचें कधींही समाधान होणार नाहीं. चल, चल त्या भोळ्या राजमल्लपुढें नेऊन तुझीं सर्व कारस्थानें उजेडांत आणतो. ( त्याला उठवतो. )

**जयपाल**—नको, नको, भीमय्य शेवटीं असा माझा घात करूं नको. तूं मागशील तितक्या मोहोरा देतो. पण असें करूं नको. भीमय्य, तुझ्या पाया पडतो. भीमय्य-भीमय्य— ( भीमय्य त्याला फरफटत नेतो. )

---

### प्रवेश ४ था—

( राजमल्ल एकटा विचार करीत बसला आहे. )

**राजमल्ल**—या घरभेद्यांचीं काय कारस्थानें चाललीं आहेत पहा! पण माझेंच नशीब बलवत्तर, म्हणूनच जयपालासारखा चतुर साथीदार मिळाला. आणि योग्यवेळीं त्यांच्या कारस्थानाचा स्फोट होऊन त्यांना पुरेपूर प्रायःश्चित्त मिळालें. हा रक्कसगंग—प्रत्यक्ष पाठचा भाऊ पण तोही त्यांतच सामील! अरे वा! मला पदच्युत करून राज्य मिळवूं पहातोस काय? बैस आतां मरेपर्यंत त्या अंधारकोठडींत, चामुंडरायाच्या नांवाचा जप करीत...... पण हा जयपाल कुठें गेला, ( कवि रन्न येतो. )

**रन्न**—महाराजांचा विजय असो.

**राजमल्ल**—कविराज, पाहिलंत या कारस्थानी लोकांनीं काय काय प्रकार चालविले होते ते? आणि तुम्ही म्हणे त्या चामुंडरायाच्या पराक्रमाचें पुराण लिहिणार होता! लिहा आतां त्याच्या दुष्कृत्यांचें पुराण!

**रन्न**—नको, महाराज असे अपशब्द उच्चारून आपली जीभ विटाळूं नका. चामुंडराय खरोखरीच पूर्ण निर्दोषी आणि महान् वीर पुरुष आहेत. प्राचीन कालापासून कविजनांनीं ज्या वीर पुरुषांचें गुणवर्णन करून पुराणें रचिलीं त्याच मालिकेंत बसण्याची चामुंडरायांची योग्यता आहे, महाराज आपण उपरोधिकपणें बोलत असला तरी हा कवि रन्नच काय, पण जगाच्या अंतापर्यंत शेकडो कवि त्यांचे गुणवर्णन करून पुराणें रचतील! महाराज—

**राजमल्ल**—बस्स्, बस्स्, एक शब्दही पुढें ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. एकूण तुम्हीही त्या फितुरी लोकांच्या कटांतच सामील आहात तर? ठीक आहे, कवि रन्न तुमची नेमणूक आजपासून बंद केली असून राजकवि-पदावरून तुम्हांला दूर केलें आहे. इथून तिथून सगळाच चोरांचा बाजार!

**रन्न**—महाराज, आपण दूर करण्यापूर्वीच मी येथून निघून जाण्याच्या विचारानेंच आलों आहे. सध्यां चामुंडराय तीर्थयात्रेस निघाले असल्यामुळें त्यांच्याच सहवासांत काळ घालवावा अशी माझी इच्छा आहे.

**राजमल्ल**—अरे वा! चामुंडराय तीर्थयात्रेला निघाले काय? पण ही यात्रेची टोळधाड कुठलें राज्य तर उलथून पाडणार नाहीं ना? यात्रा करतात हाणे यात्रा?

**रत्न**—महाराज, आपली दृष्टी बदलल्यामुळें प्रत्येक गोष्ट आपल्याला विपरीत भासत आहे. चामुंडरायांची तशी ढोंगी वृत्ती असती, तर हजारो लोक त्यांच्याबरोबर यात्रेला निघाले नसते. पण तुमच्या दृष्टीनें हे सर्वच लोक विश्वासघातकी, चोर, दुष्ट आणि कारस्थानी आहेत. आणि ज्या धूर्तानें आजपर्यंत अनेक सामंतांना चिथावणी देऊन गंगराज्याविरुद्ध अनेक कारस्थानें केलीं, तोच कपटी जयपाल आज आपला विश्वासू प्राणप्यारा बनला आहे. ज्याच्या पूर्वचरित्रासंबंधीं तिळमात्र माहिती नाहीं, त्याच्याच सांगण्या-वरून गंगराज्यरक्षक चामुंडरायाला विश्वासघातकी ठरवून दूर केलें, पाठच्या भावाला तुरुंगांत डांबून ठेवलें; आणि जन्मदात्या मातेच्या शब्दाचीही तुह्मी पर्वा केली नाहीं. जेथें राज्यदेवताच अंध बनली आहे, तेथें आमच्यासारख्यांनीं सांगून तरी काय उपयोग होणार आहे? महाराज क्षमा करा. (इतक्यांत भीमय्य जयपालास पकडून धेऊन येतो.)

**भीमय्य**—ज्या हरामखोराच्या कारस्थानाला बळी पडून वज्रदेवा-सारखे सामंत प्राणाला मुकले, पंचलदेव, मुडुराचय्यासारखे आधारस्तंभ गंगराज्याचेच शत्रू बनले, आणि अखेर ज्याच्या मायावी पाशांत तुह्मी देखील सांपडून आपला सत्यानाश करून घेत आहांत, त्या या नराधमाचीं कृष्ण-कारस्थानें मी आज उघडकीस आणीत आहे. महाराज या—याच दुष्टाच्या सांगण्यावरून अनेक कारस्थानांत सामील होऊन मी देखील दुष्कृत्यांचा भागीदार बनलों आहे. याच नराधमाच्या शब्दावर विश्वास ठेवून तुह्मी आपल्या भावाला अंधारकोठडींत ठेविलें, आणि चामुंडरायासारख्या वीर महात्म्याला विश्वासघातकी ठरविलें. इतकेंच काय, पण या दुष्ट हरामखोरानें चामुंडरायाचा वध करण्यासाठीं मला पाठविलें होतें. पण तें दुष्कृत्य माझ्या हातून न घडल्यामुळें माझ्यावर देखील शस्त्र चालविण्यास यानें कमी केलें

नाहीं ! महाराज आपलेंच सुदैव, म्हणून मला ही सद्बुद्धी सुचली. आणि सर्व कारस्थानांचा उलगडा झाला. नाहींपेक्षां आज ना उद्यां आपलाही घात करून यानें गंगराज्य उध्वस्त केलें असतें.

**राजमल्ल**—हाय, हाय ! आतां कोणत्या तोंडानें मी तुम्हां सर्वांची क्षमा मागूं ? अरेरे ! चामुंडरायासारख्या देवतातुल्य महात्म्याला कसें तोंड दाखवूं ? रक्कसगंगापुढें आतां काय सांगूं ? .....धिःकार, धिःकार असो माझ्या अधमपणाला ! भगवान्, यावेळीं धरणी दुभंगून किंवा ज्वालामुखीचा स्फोट होऊन इथल्या इथें माझा अंत झाला, तर किती चांगलें होईल बरें ? कविराज, माझ्या या मूर्खपणामुळें जग मला काय म्हणत असेल ? ( जयपालाकडे पाहून ) हरामखोरा, तुझ्याच भुलथापांना बळी पडून माझ्या सुविचाराचें दिवाळें निघालें. नराधमा, इथल्या इथें तुझा शिरच्छेद करून तुझ्या सर्व कारस्थानांची समाप्ती करतो. ( तरवार उपसून त्याच्यावर धावतो. रन्न त्याला अडवितो. )

**रन्न**—थांबा महाराज, त्या दुष्टाचा असा एकदम वध करूं नका. अनेक हालअपेष्टा भोगून अंधारकोठडींत तळमळतच त्याचा अंत झाला पाहिजे. केलेल्या दुष्कृत्याबद्दल पश्चात्ताप करण्याची त्याला संधी द्या.

**राजमल्ल**—कविराज, अगदीं योग्य वेळीं या दुष्टाचें कारस्थान उघडकीला आलें. नाहींपेक्षां माझ्याकडून आणखी कोणता अनर्थ घडला असता हें सांगतां येत नाहीं. ज्यानें याचा गौप्यस्फोट केला त्या या उपकारकर्त्याला एक हजार होन बक्षीस द्या. आणि या अधमाला अंधारकोठडींत पाठवून ताबडतोब रक्कसगंगाची सुटका करा. मला याक्षणीं चामुंडरायांची भेट घेऊन त्यांची क्षमा मागितली पाहिजे. ( राजमल्ल एका बाजूनें व बाकीचे दुसऱ्या बाजूनें जातात. )

---

**प्रवेश ९ वा—**

( स्थळ—जंगल—चामुंडराय साध्या वेशांत धनुष्य घेऊन भटकत आहे. )

**चामुंडराय**—मातेच्या आग्रहासाठीं मनाचा हिय्या करून बाहुबलीच्या मूर्तीचा शोध करण्यासाठीं बाहेर पडलों पण हीं गोष्ट शक्य आहे काय ? चक्रवर्ती भरतेश्वरानें निर्माण केलेल्या त्या प्रचंड मूर्तीचें दर्शन या कालीं होणें शक्य नाहीं, असें येथल्या सर्व मुनिजनांनीं सांगितलें. मग या रानावनांतून भटकून अखेर निराशाच पदरीं पडायची ना ? गंगराज्य रक्षणाचा इतका प्रयत्न करून ज्याप्रमाणें शेवटीं विश्वासघाताचें फल मिळालें, त्याचप्रमाणें या यात्रेंतही निराशेनें तळमळतच भटकावें लागणार काय ? माझ्याबरोबर आलेल्या बिचाऱ्या हजारों यात्रेकरूंना किती कष्ट सोसावे लागत आहेत ! भगवान् अशा निराशेंत तडफडून मरण्यासाठींच या चामुंडरायाचा जन्म झाला होता काय ? बाहुबलीमहाराज......( दगडावर डोकें टेकतो व झोंपी जातो. इतक्यांत एक यात्रेकरू येतो. )

**यात्रेकरू**—अहाहा, या चंद्रगिरी पहाडावरील निसर्गशोभा किती पण रम्य आहे ! येथील हीं सुंदर जिनमंदिरें, आणि या तपोभूमींत निवास करीत असलेले दिगंबर मुनि, यांच्या दर्शनानें माझ्या मनाला इतकी शांतता वाटते आहे कीं, ही पवित्र भूमी सोडून पुढें एक पाऊलही जाऊं नये. ( चामुंडरायाकडे पाहून ) पण इथें हे कोण ? चामुंडराय ? यांना तर झोप लागलेली दिसते. या रम्य शिलातलावर त्यांना क्षणभर विश्रांती घेऊं दे. आम्हां सर्व यात्रेकरूकरितां किती कष्ट सहन करतात ते ! जणुं काय धर्माचाच अवतार आहे. ( जातो )

**चामुंडराय**—( एकदम जागे होऊन ) बाहुबली, बाहुबली, गोमटेश्वर महाराज,......देवी, कुठें गेली ती शासनदेवता ? मी हें सर्व स्वप्नांतच पाहिलें तर ? हो पण देवीनें काय संदेश दिला ? ( पडद्यांतून आवाज— " चामुंडराय, निराश होऊं नको, ऊठ येथून समोरच दिसणाऱ्या या

इंद्रगिरी पर्वताच्या शिखरावर बाण सोड, ह्मणजे तुला बाहुबली महाराजांचें दर्शन होईल '' ) हा पहा अजून देवीचा संदेश या वनप्रांतांत घुमत आहे ! हें खरें असेल ? कीं अहोरात्र लागलेल्या ध्यासामुळें झालेला हा भास असेल ? .. नाहीं, हा भास नाहीं, हा देवीचाच दृष्टांत आहे. ( धनुष्य घेऊन उभा राहातो ) शासन देवते, या चामुंडरायानें आजपर्यंत केलेल्या कर्तव्यनिष्ठेचें आणि धर्माचरणाचें जर कांहीं महत्व असेल, तर तुझ्या संदेशाप्रमाणें भगवान् गोमटेश्वराचें दर्शन घडेल. जय बाहुबली—( असें ह्मणून बाण सोडतो. आणि मोठा आवाज होऊन समोरच्या पहाडावरील दगड ढांसळून बाहुबलीच्या प्रचंड मूर्तीचें दर्शन होतें. )

**चामुंडराय**—( गुढगे टेकून ) धन्य धन्य झालों मी आज ! पुरुवंशदीपक क्षात्रकुलशिरोमणी बाहुबलींचें दर्शन घडल्यामुळें माझा जन्म सफल झाला. आज माझ्या कर्तव्यनिष्ठेचें मला फळ मिळालें, माझी मातृसेवा पूर्ण झाली. बाहुबली महाराज, या चामुंडरायाच्या बाहूंत ज्याप्रमाणें अनंतबल दिलें आहे. त्याचप्रमाणें धर्मप्रसार करण्याचें सामर्थ्य द्या. ( पुन्हां वंदन करतो. पडद्यांतून शेकडों लोकांचा आवाज ऐकूं येतो. '' ती पहा, बाहुबलीची प्रचंड मूर्ती, जय बाहुबली महाराज '' असा जयघोष होत असतो. आणि चामुंडरायाची माता व एकदोन यात्रेकरू चामुंडरायाजवळ येतात )

**काललदेवी**— जय गोमटेश्वर बाहुबली, जय, ( वंदन करिते ) बाळ चामुंडराय, आज माझ्या नेत्रांचें पारणें फिटलें. माझ्या अंतःकरणाला पूर्ण शांती मिळाली. चामुंडराय, तूं आपल्या सद्गुणांनीं आणि एकनिष्ठ भक्तीनें देवतांनाही वश केलेस; आणि ही जगद्वंद्य प्रचंड मूर्ती शोधून काढलीस, यामुळें जगांत तुझी कीर्ती चिरकाल टिकेल. तुझ्यासारखें अद्वितीय रत्न माझ्या उदरीं जन्माला आलें याबद्दल मला किती किती धन्यता वाटते ह्मणून सांगूं ! चामुंडराय, आतां माझी कांहीं एक आशा नाहीं. याक्षणीं मी सुखानें डोळे मिटेन !

**चामुंडराय**—मातार्जी हें सर्व आपल्याच आशीर्वादाचें फळ आहे. आपल्याच सुशिक्षणामुळें मला निःस्वार्थ बुद्धीनें जनसेवा करतां आली आणि आपल्याच एकनिष्ठ भक्तीमुळें या विश्वश्रेष्ठ प्रतिमेचें मलाही दर्शन घडत आहे. मातार्जी—( वंदन करतो. )

**काललदेवी**—बाळ चामुंडराय, शतायुषी हो. तुझ्या हातून अशीच धर्मसेवा आणि राष्ट्रसेवा घडूं दे !

( पडद्यांतून-" चामुंडराय, चामुंडराय " असा राजमल्लचा आवाज येतो. )

**राजमल्ल**—चामुंडराय, या अविचारी राजमल्लास क्षमा करा. आपला उपमर्द करून मी अत्यंत अधमपणा केला आहे ! चामुंडराय, माझ्या अज्ञानावस्थेंत सर्व राज्याची जबाबदारी स्वीकारून तुह्मीच मला गादीवर बसविलें ना? अनेक शत्रूंचा नायनाट करून गंगराज्याचें वैभव तुह्मीच वाढविलें ना ? मग आपल्या विवेकभ्रष्ट अशा या लहान भावाला तुह्मी क्षमा करणार नाहीं काय ? वीरवर, आपण इतक्या निस्वार्थ बुद्धीनें गंगराज्याची सेवा केली आहे कीं, या गादीवर बसण्याचा खरा अधिकार आपला आहे. माझ्यासारख्या अविचारी आणि दुर्बल राजासाठीं हें सिंहासन निर्माण झालेलें नाहीं. जनसेवा आणि धर्मसेवा करण्यासाठींच सिंहनंदि आचार्यांनीं शुभाशिर्वाद देऊन ही गादी निर्माण केली. मग त्या गादीवर पाऊल टेवण्याची माझी योग्यता आहे काय ? नाहीं, आणि ह्मणूनच मी त्या गादीचा त्याग करून हें सर्व राज्य आपल्या पायीं वाहिलें आहे ! ( गुडघे टेकून बसतो ) चामुंडराय, त्याचा स्वीकार करून मला क्षमा करा. ह्मणजेच माझ्या अविचारी मनाला थोडेंतरी समाधान होईल.

**चामुंडराय**—महाराज, हें काय ? उठा, आपण असें काय करीत आहांत ? दुष्टांच्या सहवासामुळें क्षणकाल आपल्या हातून अविचार घडला असला, तरी पश्चात्तापानें आपलें अंतःकरण शुद्ध झालें आहे. झाल्या गोष्टीबद्दल आपण मुळींच खेद मानूं नका. या गंगवंशाच्या गादीवर पाऊल

ठेवण्याचा आपल्यावांचून दुसऱ्या कोणाचाही अधिकार नाहीं. आह्मी केवळ त्या गादीचे सेवक आहोत. महाराज, आजपर्यंत मी त्या गादीची जी सेवा केली, ती त्या सिंहासनावर चढण्याकरितां नसून, कर्तव्य ह्मणून केली आहे. महाराज, आपण निश्चिंतपणें त्या गादीचा स्वीकार करा. हा चामुंडराय पूर्ववत् गंगराज्याची सेवा करण्यास तयार आहे...पण महाराज, अद्याप आपलें लक्ष या बाहुबलीच्या मूर्तीकडे गेलें नाहीं !

**राजमल्ल**—अहाहा ! मी काय पहातो आहे हें ? मी स्वप्नांत तर नाहीं ना ? चामुंडराय तुह्मी खरे वीर आहात. ( त्याला कडकडून भेटतो ) तुह्मी जरी या राज्याचा स्वीकार करीत नसलां तरी या दक्षिण भारताचे आपण अनभिषिक्त राजेच आहात ! आज आपल्या उदार-थोर अंतःकरणाची कल्पना आली. आपण माझ्यासारख्या कृतघ्नाला क्षमा करून या अद्वितीय प्रचंड मूर्तीचें दर्शन घडविलें याबद्दल मी आपला आजन्म ऋणी आहे. चामुंडराय, या मूर्तीचा शोध लावून आपण गंगराज्याच्या वैभवावर सुवर्ण कलश चढविला आहे. धन्य, धन्य आहांत तुह्मी. चामुंडराय, आपण जरी या राज्यपदाचा स्वीकार केला नाहीं तरी यापुढें मी आपल्याला ' राजा ' हें बहुमानाचें पद अर्पण करीत आहे. ( इतक्यांत रत्न व रक्कसगंग येतात. )

**रक्कस**—चामुंडराय, मला क्षमा करा. दादा, शेवटीं तरी आपल्याला सद्बुद्धी सुचली याबद्दल मला मोठा आनंद होत आहे.

**राजमल्ल**—रक्कस, हें सर्व चामुंडरायांच्या उदार अंतःकरणाचेंच फळ आहे ! जा, तूं पुढें जाऊन राजधानींत चामुंडरायांच्या स्वागताची तयारी कर. कविराज, तुह्मी चामुंडरायांच्या चरित्रावर एक सुंदर ग्रंथ लिहा. जनहो, एकवार माझ्या समक्ष चामुंडरायांचा ' राजा ' ह्मणून जयजयकार करा.

**सर्वजण**—' राजा ' चामुंडरायांचा जयजयकार असो.

**= अंक ३ रा समाप्त. =**